# हॉकी

लेखक

शरद जोगळेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

प्रकाशक

सचिव, म. रा. साहित्य संस्कृती मंडळ
मंत्रालय, मुंबई ३२



मुद्रक

य. गो. जोशी
आनंद मुद्रणालय
१५२३ सदाशिव, पुण ४११०३०

# प्रास्ताविक

मनुष्यप्राणी जन्माला आल्यानंतर हिंडू-फिरू लागला की, बाल्यावस्थेपासूनच त्याची खेळण्या-बागडण्याकडे नैसर्गिक प्रवृत्ती असते. बाल्यावस्थेतच चापल्य, चातुर्य, सावधानता, दमछाक, मानसिक व शारीरिक समतोल वगैरेंचे संस्कार त्याच्यावर होत असतात. तो जसजसा मोठा होत जातो तसतसे आपली देहयष्टी सुदृढ, सुडौल, सुंदर व आकर्षक असावी असे त्याचे स्वप्न असते. त्याची वाढ ज्या परिस्थितीत व वातावरणात होत असते त्या अनुषंगानेच तो अवतीभोवतीच्या खेळांकडे जास्त आकर्षला जातो. पण त्याच्याच जोडीला प्रत्येक व्यक्तीची आवड व ओढ ज्या खेळाकडे विशेष असेल तिकडेच त्याचा कल असतो, हे स्वाभाविकच आहे. परंतु त्यासाठी योग्य ते प्रयत्न केल्याशिवाय ते खरे होऊ



( १ ) गुरबक्षसिंग ( २ ) कै. ध्यानचंद ( ३ ) एम. पी. पानसे ( ४ ) कै. किसनलाल

शकणार नाही. म्हणूनच त्यासाठी सतत मेहनत व सराव यांची जोड असल्याशिवाय त्याला यश मिळणार नाही. तेव्हा प्रत्येक व्यक्तीने त्याच्या आवडीच्या खेळाचा अभ्यास व व्यासंग करणे अत्यंत महत्त्वाचे आहे.

खेळ म्हणजेच क्रीडा, आणि क्रीडा ही कला आहे! कला मनरंजनासाठीच असल्यामुळे कलेकडे, म्हणजेच खेळाकडे प्रत्येक व्यक्ती कमी-अधिक प्रमाणात आकर्षिली जाते हे सत्य आहे! मग तो खेळ कोणता का असेना! कारण व्यक्तिव्यक्तीप्रमाणे आवडही भिन्नभिन्नच असते.

तेव्हा या सर्वसाधारण नियमाला अनुसरूनच भारतातील निरनिराळ्या राज्यांत वेगवेगळे खेळ खेळले जातात. व्यायामाचे व धावण्या-पळण्याचे प्रकार बहुतेक सगळीकडे सारखेच आहेत. पण खेळामध्ये प्रत्येक ठिकाणी विविधता आहे हे स्पष्ट दिसून येते.

आपल्याकडे जे विदेशी खेळ खेळले जातात त्यांचा प्रसार व प्रभाव इथे इतका पडला आहे की, अगदी आबालवृद्धापासून बहुतेक सारेजण या खेळांत खूपच रस घेत असल्याचे दिसते. विशेषेकरून क्रिकेट खेळाचे स्तोम हल्ली भारतात फारच माजले आहे. ' स्तोम ' म्हणण्याचे कारण हेच की, त्यात फार वेळ फुकट जातो आणि त्या मानाने मनोरंजनाचा भाग त्यात किती आहे हा एक प्रश्नच आहे. तसे पाहिले तर शरीर सुदृढ होण्यासाठी भरपूर व्यायाम होणारे असे भारतीय वैशिष्ट्याचे कबड्डी व खो खो हे दोनच मैदानी खेळ बहुतेक सर्वत्र अलीकडेच लोकप्रिय होत आहेत; आणि त्यांना ऑलिंपिक खेळात स्थान मिळावे म्हणून प्रयत्नही चालू आहेत. क्रिकेट हा वेळखाऊ आणि खर्चिक असा खेळ आहे. म्हणून असा विचार साहजिकच मनात येतो की, इतर विदेशी खेळांत कमी खर्च, कमी वेळ, भरपूर व्यायाम, शारीरिक तन्दुरुस्तीला पोषक, मनरंजन व भावनांचा चढउतार करणारे असे हॉकी व फुटबॉल हे दोन खेळ असताना त्याकडे जितके लक्ष वेधले गेले पाहिजे तितके ते जात नाही याचे कारण काय ?

आता आपण येथे हॉकी या खेळाचाच विचार करणार आहोत.

हॉकी ( चेंडूने खेळला जाणारा खेळ ), जगातील जुन्या खेळांपैकी एक आहे असे समजले जाते. आपणाकडे हॉकीचा खेळ विसाव्या शतकाच्या सुरुवातीला आला असे दिसते आणि आस्ते आस्ते त्याची आवड थोडयाफार प्रमाणात निर्माण होऊ लागली. शरीराला चपलता व काटकपणा येण्यासाठी हॉकी व फुटबॉल हे खेळ जास्त उपयोगी आहेत, म्हणूनच " मुलांनी गीतापठणापेक्षा फुटबॉल, हॉकीसारख्या खेळांत जर जास्त रस घेतला तर ते जास्त उचित होईल, " असे आपल्याकडील एका थोर व जागतिक कीर्तीचे स्वामी विवेकानंद यांच्यासारख्या महान व्यक्तीने म्हटले आहे.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीला जरी हॉकी हा खेळ भारतात रुजू लागला होता तरी प्रत्यक्ष मोठमोठ्या सामन्यांत अगर स्पर्धांतून भाग घेण्याइतकी तयारी होण्याला आपल्याला पावशतकाइतका अवधी लागला; आणि त्यानंतर जेव्हा आपल्याकडे खेळाडूंना आत्मविश्वास वाटू लागला तेव्हा जागतिक कीर्तीच्या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत

भारतीय संघाने १९२८ साली प्रथम भाग घेतला आणि मोठ्या आनंदाची व अभिमानाची गोष्ट ही की, त्यात आपण अपूर्व यश मिळविले. तेव्हापासून हॉकी हा आपल्याच वैशिष्ट्याचा खेळ आहे इतका तो आपण आत्मसात केला, आणि म्हणूनच पुढे ३२ वर्षे सतत या खेळात आपण वर्चस्व राखले होते. पण त्यानंतर म्हणजे १९६० सालानंतर भारताची पीछेहाट होऊ लागली. ती कां व कशी झाली याचा शोध घेणे अत्यंत जरुरीचे आहे. तेव्हा त्याचा परामर्श स्वतंत्रपणे घेतला आहे.

हॉकीचा खेळ जास्त लोकप्रिय होऊन त्याची वाढ होण्यासाठी या खेळाची माहिती व प्रचार व्हावा तसा झालेला नाही हे उघड दिसून येते. हा खेळ भारतातील सर्व राज्यांत कमी-अधिक प्रमाणात खेळला जातो, पण विशेषतः महाराष्ट्रात या घडीला तीनचार ठिकाणे सोडल्यास, तो अगदीच दुर्लक्षिलेला आहे असे खेदाने म्हणावे लागते. म्हणून या खेळासंबंधी शक्य तितकी माहिती देऊन यातले क्रीडाकौशल्य लवकर कसे अवगत करावे, कोणत्या पद्धतीने सराव करावा, खेळाडूंच्या अंगी क्रियाव्यापारांचा मेळ कसा असावा, क्रीडासाहित्य व क्रीडांगण, शारीरिक क्षमता वगैरे सर्व गोष्टींचा विचार करून या खेळात आपल्याला प्रगती कशी करता येईल, व्यक्तिशः नैपुण्यामुळे फायदा मिळवून त्यायोगे आपल्या देशाची मान कशी उंचावता येईल वगैरे गोष्टी मनात ठेवूनच या पुस्तकाची आखणी करण्याचा प्रयत्न केला आहे.

● ● ●

प्रकरण १

# इतिहास व विकास

'हॉकी' हा खेळ सर्वप्रथम केव्हा आणि कोठे सुरू झाला हे खात्रीपूर्वक सांगणे कठीण आहे. एकदोन ठिकाणी, 'असला खेळ सुमारे चार हजार वर्षांपूर्वी खेळला जात असावा,' असा उल्लेख आहे. पण त्याला नक्की आधार मिळत नाही. तरीही उपलब्ध माहितीवरून या खेळाचा इतिहास व विकास कसकसा होत गेला ही हकीकत मोठी मनोरंजक व उद्‌बोधक आहे.

अथेन्सला झालेल्या एका उत्खननात सापडलेल्या अवशेषांत इसवी सनापूर्वी ५१४ ते ४४९ या काळात या खेळाचे भिंतीवर केलेले चित्रीकरण आढळते ( चित्र नं. १·१ पाहा ). या चित्रात दोन खेळाडू विरुद्ध दिशांना उभे राहून हातातील एक



चित्र १·१ : उत्खननात सापडलेले चित्र

बाजूला बाक असलेल्या काठ्यांचा भाग जमिनीला टेकवून त्या दोन्हीमध्ये, चेंडू ठेव-लेला दाखविला आहे. ते दोघे खेळाडू एकमेकांच्या काठीला काठी भिडवीत आहेत असे दिसते, म्हणजेच ते खेळाला सुरुवात करीत आहेत. आजच्या रूढ शब्दात ते 'बुली' करीत आहेत असे म्हणता येईल. या दोन खेळाडूंव्यतिरिक्त आणखी चार खेळाडू तशाच काठ्या घेऊन खेळाच्या पवित्र्यात उभे असलेले चित्रात दाखविले आहेत.

एकदोन ठिकाणी, असला खेळ सुमारे चार हजार वर्षांपूर्वी खेळला जात असल्याचा उल्लेख आहे, पण त्याला तसा नक्की आधार मिळत नाही. परंतु एकंदर माहितीचा विचार करता असे दिसते की, गोलाकार केलेले दगड फेकणे अगर पायांनी मारणे हीच बहुतेक चेंडूच्या खेळांची सुरुवात असावी. परंतु दगडी चेंडू फेकणे अगर

पायांनी मारणे यात बराच धोका वाटू लागला म्हणून आस्ते आस्ते जनावरांच्या शरीरातील काही चरबीचा भाग चेंडूच्या जागी वापरण्यास सुरुवात झाली. या सुरुवातीच्या खेळातही स्पर्धा होत्या. पुढे काही ठिकाणी काठी आणि चेंडू यांच्या साहाय्यानेच खेळाची सुरुवात झाली असे दिसते.

प्राचीन इजिप्तमध्ये देखील ' हॉकी 'सारखा काठीचेंडूचा खेळ खेळला जात असावा असे काही पुरावे सापडतात. तसेच ख्रिस्तपूर्व ५०० वर्षांच्या सुमारास पर्शियन लोक ' पोलो ' खेळत असत आणि ' हॉकी ' हे त्याचेच एक स्वरूप असावे असे समजले जाते.

पर्शियाहून हा खेळ ग्रीसमध्ये आला आणि तेथून तो रोमन लोकांनी स्वीकारला. त्या वेळची जी चित्रे उपलब्ध आहेत त्यांत खेळाडूंच्या हातातील काठ्यांचा ' बाक ' आधुनिक हॉकीप्रमाणे वरच्या दिशेला नसून खालच्या दिशेला होता. रोमन लोकांनी या खेळाला एक वेगळे रूप दिले होते. वाकविलेल्या काठीने ते हा खेळ खेळत. त्यांच्या या खेळाला ' पॅग्नेशिया ' असे म्हणत. कातडी आवरणात पिसे भरलेला चेंडू खेळात वापरीत असत. त्यापूर्वी दगडाचे लहान गोळे चेंडू म्हणून घेतले जात होते.

रेड इंडिअन्सपैकी ॲसटेक-इंडिअन्स म्हणून जे ओळखले जात, ते लोक हा काठीचा खेळ खेळत असावेत असा पुरावा ' मेक्सिको 'मध्ये सापडला आहे. अमेरिकेतील रेड-इंडिअन्सही काठीचेंडूचा खेळ खेळत होते. परंतु तो खेळ आधुनिक हॉकीशी मिळताजुळता नव्हता. शेजारी शेजारी राहणाऱ्या रानटी वसाहती एकमेकांना खेळासाठी आवाहन करीत. त्यांच्या या खेळाला वेळेचे बंधन नसे. त्यामुळे सूर्योदयापासून ते सूर्यास्तापर्यंत त्यांचा हा खेळ चाललेला असे. कित्येक मैल अंतरावर ' गोल ' म्हणजेच—दगडांनी रचून केलेल्या दोन खांबांमधील जागा—तयार केलेली असे. प्रत्येक बाजूला किती खेळाडू असावेत याला मर्यादा नसे. त्यामुळे खेळात अनेक खेळाडू म्हणजेच माणसे असत. खेळाडूंचा हा आकडा काही वेळा हजारापर्यंतही जाई. खेळावयाच्या काठ्या लांब व जाड असून एका टोकाला वाकलेल्या असत. काही खेळाडू लाकडी काठ्यांऐवजी ' रेन्डीयर ' प्राण्याच्या पायाच्या लांब हाडाचा काठी म्हणजेच ' स्टिक ' सारखा उपयोग करीत ( चित्र नं. १·२ पाहा ).

या खेळात खेळाडू वैयक्तिक ताकदीच्या जोरावर प्रतिपक्षाच्या गोलातून चेंडू मारण्याचा प्रयत्न करीत. हा खेळ मोठ्या ईर्ष्येने व आरडाओरडा करीत खेळला जाई. यात दांडगाई, आडदांडपणा इतका चाले की, चेंडूचा ताबा मिळविण्याच्या प्रयत्नांत कित्येकजण जायबंदी अगर अपंगही होत. काही वेळा या खेळात काही खेळाडू नुसतेच जखमी होत नसत तर ठारही होत. म्हणजेच क्रीडांगणांला रणांगणाचे स्वरूप येत असे. याचा अर्थ, खेळ हा मनोरंजनासाठी जरी होता तरी यात युद्धपरिस्थितीही निर्माण होई, पण त्याचा कोणालाच विषाद वाटत नसे.

यानंतर हा खेळ युरोपात लोकांना माहीत होऊ लागला. फ्रान्समधील लोकांचा हा



चित्र १.२ : हाडाच्या काठीचा स्टिकसारखा उपयोग

आवडता खेळ होता असे दिसून येते. धनगराच्या हातातील एका टोकाशी बाक असलेल्या काठीला जुन्या फ्रेंच भाषेत ' हॅके ' असे म्हणत आणि याच फ्रेंच शब्दापासून पुढे ' हॉकी ' हा शब्द रूढ झाला असावा असे वाटते. यापूर्वी ' नॅंडी ' नावानेही हा खेळ लोकप्रिय होता, असा काही ठिकाणी उल्लेखही आहे. ' कॅमॉक ' किंवा ' कॅमॉके ' या नावाने हा खेळ इंग्लंडमध्ये पूर्वी ओळखला जात असे. वाकलेल्या काठीसाठी 'गॅलीक' भाषेत वापरण्यात आलेल्या ' कॅमन ' या शब्दावरून वरील नाव पडले असावे. आयर्लंड-मध्ये या खेळाला ' हर्ले ' म्हणत आणि याचा उल्लेख साधारणपणे इ. स. १२७२ च्या आसपास दिसतो. या खेळात प्रत्येक बाजूला ९ खेळाडू असत आणि खेळात तांब्याचा चेंडू वापरला जात असे. तसेच ज्या बाजूचा पराभव होई त्या बाजूच्या खेळाडूंना मारपीट होई, आणि काही वेळा जीवेदेखील मारले जाई. ही खेळातील चुरस म्हणायची की क्रूरता हा प्रश्नच आहे !

हा खेळ पुढे स्कॉटलंडमध्ये लोकप्रिय होत गेला तेव्हा तो ' शेन्ती ' किंवा ' शिंटी ' या नावाने प्रसिद्ध होता.

वर एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे हा खेळ अगदी रानटी अवस्थेत असल्यामुळे त्याला वेळेचे बंधन अगर नियमांचा अडथळा असा काही नव्हता. पण जसजसा हा खेळ लोकप्रिय होत गेला तसतसे या खेळाचे रूप पालटू लागले आणि नियम, वेळेचे बंधन वगैरे अस्तित्वात आली आणि कालमान-परिस्थितीप्रमाणे फरकही होत गेले. हॉकीचे रूप व खेळण्याची पद्धत या गोष्टी प्रथम नव्हत्याच मुळी. तेव्हा हॉकी खेळाचा विकास होण्यासाठी पुष्कळ बाबतींत संशोधन करण्याची जरुरी होती; आणि तसे पाहिले तर विकास व संशोधन यांचा अत्यंत निकटचा संबंध आहे असे वाटल्यावरूनच पुढे ' हॉकी '

खेळाबाबत एक मध्यवर्ती नियामक मंडळ असावे असे मत सर्वत्र दिसून येऊ लागले.

विल्यम फिट्ज स्टीफनने ११७५ मध्ये 'लंडन बॉल प्ले' या पुस्तकात केलेल्या एका खेळाचे वर्णन आधुनिक हॉकी खेळाशी बरेच मिळतेजुळते आहे.

अशा तऱ्हेने या खळाची आवड सर्वत्र उत्पन्न होऊ लागली होती व लोकप्रियता वाढत होती. परंतु इंग्लंडमध्ये खुद्द राज्यकर्त्यांकडूनच या खेळाला खो घालण्याचे प्रयत्नही झाले हेही नमूद करणे जरूर आहे. इ. स. १३६५ साली तिसरा एडवर्ड बादशहा तर या खेळाचे उच्चाटन करण्याच्याच मागे लागला होता. जो कोणी हा खेळ आपल्या जागेत खेळू देईल त्याला २० पौंड दंड आणि ३ महिन्यांची सजा ठोठावण्यात यावी असा एक हुकूम त्याने जारी केला होता. पुढे इ. स. १३८८ मध्ये दुसऱ्या रिचर्डने हा खेळ बंदी घातलेल्यांपैकी एक आहे असा फतवाही काढला होता. अशा तऱ्हेने जरी अडथळे येत होते तरीही या खेळाची प्रगती होतच होती आणि लोकप्रियता कमी न होता वाढतच होती.

हा खेळ असा सर्वत्र वाढीला लागला होता पण मध्यंतरीच्या काळात त्यात झालेली स्थित्यंतरे व प्रगती यांची नोंद झालेली कुठेच आढळून येत नाही. पण पुढे १८०८ साली लंडन येथे 'ब्लॅक हीथ क्लब' हा गोल्फर्ससाठी स्थापन झाला. काही काळाने याच क्लबमध्ये हॉकी, फुटबॉल आणि रग्बी, या खेळांचाही समावेश करण्यात आला. हॉकी खेळाची जशी प्रगती व प्रसार होऊ लागला तसे १८६१ च्या सुमारास केवळ हॉकीचा एक स्वतंत्र विभाग या क्लबात अस्तित्वात आला. तसे पाहिले तर इंग्लंडमधील शाळांमधून या खेळाला खरी प्रसिद्धी मिळाली इ. स. १८००च्या सुमारास. 'टॉन ब्रिज' शाळेच्या विद्यार्थ्यांनी जवळच्या जंगलातून काठ्या मोडून आणल्या. नंतर त्या वाफारून त्यांना हवा तसा आकार देऊन मोठ्या भट्टीत त्या वाळविण्यात आल्यानंतर त्या खेळासाठी घेण्यात आल्या. सुरुवातीला 'हॉकी' स्टिकच्या दोन्ही बाजूंनी सर्रास खेळले जात असे. त्यानंतर 'ओक' लाकडाची, वाफेवर वाकवून एका बाजूला पसरट झालेली अशी हॉकी स्टिक प्रथम उपयोगात आली. मऊ, गुळगुळीत अशा गोळ्याचा चेंडू म्हणून प्रथम वापर करण्यात येत होता. परंतु हा गोळा कसला होता याबद्दल तशी माहिती मिळत नाही.

सुरुवातीला २०० यार्ड लांब व ५०० ते ६०० यार्ड रुंद असे खेळाचे मैदान असे. त्यानंतर ते २७० यार्ड लांब व ७० यार्ड रुंद असे ठरविण्यात आले. आता १०० यार्ड लांब व ६० यार्ड रुंद अशी मैदानाची मर्यादा ठरली गेली आहे. गोलच्या दोन्ही खांबांमधील अंतर १० यार्डांचे असे. खेळाडू व गोल यांच्या दरम्यान जर चेंडू नसेल तर कोणाही खेळाडूला प्रतिपक्षाच्या गोलापासून ४० यार्ड अंतरात राहता येत नसे. हल्लीच्या बाजूबाहेर ( ऑफ साईड ) नियमाचे मूळ येथेच असावे असा निष्कर्ष काढला तर ते चुकीचे होणार नाही.

साधारणपणे १८४० च्या आसपास हॉकीचा पहिला क्लब इंग्लंडमध्ये स्थापन झाला

होता. जसजशी या खेळाची लोकप्रियता वाढू लागली तसतसे निरनिराळे संघ युरोपात स्थापन होऊ लागले. इ. स. १८७५ साली इंग्लंडमध्ये निरनिराळ्या हॉकी क्लबांची एक संयुक्त बैठक झाली आणि त्या बैठकीत या खेळाचे नियंत्रण व नियम करण्यासाठी एका असोसिएशनची स्थापना झाली. परंतु तिचे अस्तित्व जेमतेम ५/६ वर्षेच टिकले आणि १८८२ साली या असोसिएशनला आपला गाशा गुंडाळावा लागला. परंतु १८८३ साली ब्रिटनमध्ये 'विम्बल्डन हॉकी क्लब' स्थापन झाला आणि या खेळाचे पुनरुज्जीवन झाले. या क्लबने काही नियम तयार केले. पुढे १८ जानेवारी १८८६ रोजी 'ब्रिटिश हॉकी असोसिएशन' अस्तित्वात आली आणि हा दिवस म्हणजे आधुनिक हॉकीचा जन्मदिवस समजला जातो. त्या वेळचे प्रिन्स ऑफ वेल्स सातवे एडवर्ड हे या असोसिएशनचे पहिले अध्यक्ष होते. तेव्हापासून इंग्लंडमध्ये अनेक हॉकी संस्था निर्माण झाल्या आणि या सर्व्या ब्रिटिश हॉकी असोसिएशनच्या सदस्य झाल्या.

याप्रमाणे या खेळाची जरी प्रगती होत होती तरी फुटबॉल, क्रिकेट इतका हा खेळ लोकप्रिय झाला नव्हता आणि केवळ हौशी खेळाडूंपुरतेच याला महत्त्व होते. पण विशेष आश्चर्याची गोष्ट ही की, महिलांमध्ये या खेळाबद्दल जास्त आवड निर्माण झाली होती आणि त्याचे द्योतक म्हणजे १८८७ साली ऑक्सफर्ड विद्यापीठात झालेला महिलांचा पहिला सामना हे होय. याचाच परिणाम म्हणून की काय महिलांचा पहिला क्लब लंडनमध्ये लगेच स्थापन झाला आणि पुढे ठिकठिकाणी अनेक क्लब उदयाला आले. तसेच हा खेळ अमेरिकेत प्रथम नेण्याचे श्रेयही एका उत्साही महिलेकडेच जाते.

हॉकी खेळाची लोकप्रियता वाढत होती हे जरी खरे असले तरी त्याला जागतिक खेळाच्या दर्जाचे स्वरूप प्राप्त झालेले नव्हते. पण जसजसा या खेळाचा प्रसार होत होता तसतशी आंतरराष्ट्रीय सामन्यांसाठी हळूहळू मागणी होऊ लागली होती. याच सुमारास आयरिश हॉकी असोसिएशनची स्थापना झाली आणि लगेच इंग्लंड व आयर्लंड यांच्यात पहिला सामना झाला. हा सामना १८९४ साली लंडनजवळ 'रिचमॉंड' या ठिकाणी झाला. त्यानंतर ५/६ वर्षांनी निरनिराळ्या युरोपियन राष्ट्रांत सामने आयोजित करण्याच्या दृष्टीने आंतरराष्ट्रीय हॉकी मंडळाची स्थापना झाली. यात आयर्लंड व वेल्सचे प्रत्येकी एक व ब्रिटिश हॉकी असोसिएशनचे तीन असे पाच प्रतिनिधी होते. त्यानंतर थोड्या दिवसांनी स्कॉटलंडने स्वतःची हॉकी असोसिएशन काढली आणि १९०२ साली स्कॉटलंड आंतरराष्ट्रीय हॉकी मंडळाचा सभासद झाला. तसे पाहिले तर त्या वेळी तरी आंतरराष्ट्रीय हॉकी मंडळाची मर्यादा फक्त ब्रिटिश बेटां-पुरतीच होती. तरी ब्रिटिश बेटांबाहेरील राष्ट्रांबरोबर आंतरराष्ट्रीय हॉकी सामने आयोजित करण्याची जबाबदारी मंडळावर होतीच, आणि त्यामुळे पहिला आंतरराष्ट्रीय हॉकी सामना इंग्लंड व फ्रान्स यांच्यात पॅरिस येथे १९०७ साली झाला. त्यानंतर हळूहळू हे क्षेत्र वाढत गेले आणि पुढे जर्मनी, बेल्जियम, डेन्मार्क, हॉलंड, स्पेन, ऑस्ट्रिया व स्वित्झर्लंड या युरोपियन राष्ट्रांत हॉकीचे सामने होऊ लागले आणि

त्यानंतरच्या काळात या खेळाची कक्षा वाढून ती युरोपबाहेर गेल्याचे दिसून येते.

## ऑलिंपिक स्पर्धा

क्रीडाक्षेत्रात ऑलिंपिक स्पर्धा हा एक मोठा आणि महत्त्वाचा भाग समजला जातो. परंतु आंतरराष्ट्रीय हॉकी मंडळाची स्थापना होऊनही ऑलिंपिक स्पर्धेत हॉकीचा समावेश करण्यात आला नसल्याने या खेळाला आंतरराष्ट्रीय महत्त्वापेक्षा जास्त मोठा दर्जा नव्हता. तसे पाहिले तर १९०० सालीच पॅरिसला झालेल्या ऑलिंपिक स्पर्धेत केवळ नमुन्यादाखल हॉकीला प्रथम प्रवेश देण्यात आला होता. परंतु तेथे झालेला सामना केवळ नमुना म्हणूनच खेळला गेला आणि त्या सामन्यात कोणत्याही संघाला विजयी म्हणून घोषित करण्यात आले नाही. तरीही हॉकीला अशा तऱ्हेने जागतिक कीर्ती लाभली गेली.

## ऑलिंपिक स्पर्धेत हॉकीचा समावेश

पुढे २९ ऑक्टोबर १९०८ रोजी लंडनमध्ये झालेल्या चौथ्या ऑलिंपिक स्पर्धांमध्ये हॉकीचा समावेश प्रथम करण्यात आला. पहिला सामना स्कॉटलंड व जर्मनी यांच्यात खेळला गेला. त्यात स्कॉटलंड चार गोल्सनी विजयी झाला, पण शेवटी इंग्लंडने 'व्हाईट सिटी स्टेडियम'वर आयर्लंडचा पराभव करून ऑलिंपिक हॉकीतील पहिले अजिंक्यपद मिळविले. परंतु पुढच्याच ऑलिंपिक स्पर्धांमधून हॉकीला वगळण्यात आले. त्यानंतर पुन्हा १९२० साली हॉकीचा ऑलिंपिक स्पर्धांत समावेश झाला. परंतु पॅरिस येथील १९२४ च्या ऑलिंपिक स्पर्धेसाठी पुरेसे हॉकी संघ न आल्यामुळे हॉकी स्पर्धाच झाल्या नाहीत. त्यामुळे ७ जानेवारी १९२४ रोजी हॉकी खेळात रस घेणाऱ्या राष्ट्रांची एक बैठक पॅरिसमध्ये भरली. या बैठकीत हॉकी खेळावर नियंत्रण ठेवण्यासाठी 'फेडरेशन इंटरनॅशनल दि हॉकी' ( FIH ) या नावाने संस्था स्थापन झाली. येथून पुढे खेळाचे नियम सर्वत्र सारखे करण्याचे व सभासदांची संख्या वाढविण्याचे कामी जास्त भर देण्यात आल्याने या खेळाला कायमचे जागतिक महत्त्व प्राप्त झाले.

अमेरिकेत या खेळाची फार पूर्वीपासून सुरुवात झाली होती. पण तेथे या खेळाकडे विशेष लक्ष दिले गेले नाही. त्यामुळे तेथे हा खेळ विशेष लोकप्रिय झाला नाही. पण अलीकडेच गेल्या १०/१२ वर्षांत अमेरिकन हॉकी संघ जास्त मेहनत घेत असल्याचे दिसून येते आणि त्याचे दृश्यफल म्हणजे गेल्या दोन-तीन ऑलिंपिक हॉकी सामन्यांत त्यांनी दाखविलेले कौशल्य हे होय. रशियादेखील हॉकीमध्ये अलीकडेच बराचसा रस घेऊ लागला आहे आणि त्यामुळे ऑलिंपिक हॉकी स्पर्धा जास्त चुरशीच्या होऊ लागल्या आहेत.

या सर्व प्रपंचावरून हॉकीच्या खेळात कसकशी प्रगती होत गेली हे लक्षात आले असेलच आणि त्या दृष्टीने भारताचा या खेळात केव्हा व कसा संबंध येत गेला व त्याची लोकप्रियता, प्रगती वगैरे कशी होत गेली हे पाहणे जरुरीचे आहे.

## हॉकीची भारतात सुरुवात

ब्रिटिशांचे भारतात ( हिंदुस्थानात ) जसजसे वर्चस्व वाढू लागले तसतसे बरेच इंग्रज लोक भारतात मोठ्या संख्येने आले. तेव्हा साहजिकच त्यांनी आपल्याबरोबर त्यांचे खेळ व करमणुकीची साधनेही इकडे आणली. त्यामुळे भारतात हॉकीचा खेळ साधारणपणे १८८०–८५ च्या सुमारास आला. ब्रिटिशांचे वास्तव्य शहरांच्या कँटोन्मेंट भागातच असल्यामुळे तेथील परिसरात हा खेळ प्रथम सुरू झाला. त्यांच्याशी निगडित झालेले अँग्लो-इंडियन्स व ख्रिश्चन्स या लोकांनी प्रथम त्या खेळात रस घेतला आणि त्यानंतर आस्ते आस्ते या खेळात भारतीय लोक रस घेऊ लागले आणि त्यांच्या-तील नैसर्गिक चापल्य, चिवटपणा, काटकपणा वगैरे गोष्टींमुळे त्यांना हा खेळ लवकरच आत्मसात करता आला.

## ऑलिंपिक हॉकीत भारताचा समावेश

सुरुवातीला भारतीयांनी स्थानिक संघातल्या सामन्यांत बरेच नपुण्य पैदा केलेले जेव्हा दिसून आले तेव्हा भारताने देखील ऑलिंपिक हॉकी स्पर्धेमध्ये भाग घ्यावा, हा विचार, त्या वेळी या खेळात रस घेणारे अधिकारी, संस्थानिक, क्रीडाशौकिन वगैरेंच्या मनात दृढ झाला आणि त्याप्रमाणे ॲमस्टरडॅम येथील नवव्या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत भारतीय हॉकी संघाने १९२८ साली प्रथम पदार्पण केले, आणि पदार्पण केल्यापासून भारताने पुढे ३२ वर्षे म्हणजे १९६० सालापर्यंत हे जागतिक अजिंक्यपद आपल्याकडे ठेवले होते ही खरोखरच मोठी गौरवाची गोष्ट होती.

## पहिला संघ

या पहिल्या भारतीय हॉकी संघासाठी १६ खेळाडूंची नावे जाहीर करण्यात आली होती. त्यापैकी ३ खेळाडू इंग्लंडला अभ्यासासाठी गेले होते आणि आणखी ३ खेळाडू लंडन येथे संघाला येऊन मिळणार होते. तेव्हा अखेरीस १० मार्च १९२८ रोजी भारतीय संघ मुंबईहून जहाजाने लंडनला जाण्यासाठी निघाला. पण खेदाची गोष्ट ही की, या संघाबद्दल व हॉकी खेळाबद्दल लोकांत अजिबात कौतुक नव्हते. त्यामुळे या संघाला निरोप देण्यासाठी मुंबई बंदरावर भारतीय हॉकी फेडरेशनचे दोन अधिकारी व एक पत्रकार असे केवळ तिघेजणच हजर होते !

अशा दुर्लक्षित प्रारंभानेच भारतीय हॉकीच्या भव्य व थरारक पर्वाचा प्रारंभ झाला. या पहिल्या भारतीय हॉकी संघात जयपालसिंह ( कप्तान ), ई. पेनीगर ( उप-कप्तान ), एस. एम. युसुफ, पतौडीचे नबाब ( थोरले ), आर. जे. ॲलन, एम. रॉक, एन. सी. हॅमंड, ध्यानचंद, आर. ए. नॉरीस, कुलेन, खेरसिंह, एम. गेटले, शौकतअली, जी. मार्थिन्स, फिरोजखान, एफ. सीमन या खेळाडूंचा समावेश करण्यात आला होता.

या पहिल्याच स्पर्धेत भारताने ऑस्ट्रेलियावर ६ विरुद्ध ० गोल्स, बेल्जियमवर ९ विरुद्ध ० गोल्स, डेन्मार्कवर ५ विरुद्ध ० गोल्स, स्वित्झर्लंडवर ६ विरुद्ध ० गोल्स

आणि हॉलंडवर ३ विरुद्ध ० गोल्स असा भरघोस विजय प्राप्त केला होता.

अशा तऱ्हेने हॉकी खेळात भारताने पाय टाकल्यापासून नेत्रदीपक प्रगती करून सतत देशाची मान उंचावली होती हे जरी खरे असले तरी या खेळाला मिळावा तसा लोकांकडून प्रतिसाद मिळाला नाही हे सत्य आहे, त्यासंबंधी विचार होणे जरुरीचे.

ऑलिंपिक स्पर्धांखालोखाल आंतरराष्ट्रीय महत्त्वाचे सामने म्हणजे आशियाई हॉकी सामने. हे सामने १९५८ साली सुरू झाले. सुरुवातीला भारत धरून एकूण पाच देशांनी या स्पर्धेत भाग घेतला होता.

त्यानंतर दुसरे महत्त्वाचे समजले जाणारे हॉकीचे सामने म्हणजे 'विश्वचषक' सामने. या सामन्यांना १९७१ साली सुरुवात झाली. १९७५ सालचे विजेतेपद भारताने मिळविले होते पण ते १९७८ साली गमावले गेले.

अशा तऱ्हेने या खेळाला लोकप्रियता मिळत आहे आणि हा खेळ आता ७०/७२ देशांतून खेळला जात असून दिवसेंदिवस जास्त लोकप्रिय होऊ लागला आहे. पुरुष खेळाडूंप्रमाणेच महिलादेखील या खेळात खूपच रस घेत असून त्यांचे देखील आंतरराष्ट्रीय सामने होऊ लागले आहेत. विशेष म्हणजे १९८० च्या मॉस्को येथील ऑलिंपिकमध्ये महिला हॉकी स्पर्धा प्रथमच झाल्या होत्या.

हा झाला या खेळाचा इतिहास आणि विकास. आता या खेळासंबंधीची माहिती व इतर तपशिलाकडे वळू.

• • •

## प्रकरण २

# क्रीडांगण, साहित्य व साधने

हॉकीच्या खेळाला जेव्हा प्रारंभ झाला त्या वेळी मैदान किंवा क्रीडांगण केवढें व कसे असावे याला काहीच नियम नव्हते. त्यानंतर खेळाडूंनीच आपल्या सोयीप्रमाणे आणि क्रीडांगणांच्या उपलब्धतेप्रमाणे क्रीडांगणाची लांबी – रुंदी ठरविण्यास सुरुवात केली.

प्रथम २०० यार्ड लांब व ५०० ते ६०० यार्ड रुंद असे खेळाचे मैदान असे. त्यानंतर ते २७० यार्ड लांब व ७० यार्ड रुंद असा त्यात बदल केला गेला. पुढे काही दिवसांनी यातही बदल झाला आणि शेवटी १०० यार्ड लांब व ५५ यार्डापेक्षा कमी नाही आणि ६० यार्डापेक्षा जास्त नाही इतके रुंद अशी क्रीडांगणाची मर्यादा पक्की करण्यात आली.

### लांबी-रुंदी

सुरुवातीला खेळासंबंधी काहीच नियम नव्हते. पण १९०० साली एक ' हॉकी नियम बोर्ड ' ( Hockey Rule Board ) अस्तित्वात आले आणि त्यांनी केलेल्या नियमांप्रमाणे क्रीडांगणे व खेळ यांवर नियंत्रणे आली. त्यानंतर हे ' नियम बोर्ड ' आंतरराष्ट्रीय हॉकी फेडरेशनच्या कक्षेत आल्यापासून हॉकी खेळासंबंधीचे नियम सर्व जगभर जेथे जेथे हॉकीचा खेळ खेळला जातो तेथे लागू केले गेले.




आकृती २·१ : हॉकीच्या क्रीडांगणाची आखणी

क्रीडांगणाची लांबी, रुंदी पक्की झाली तरी गोलच्या खांबातील अंतर, मैदानावरील काही जागा, यांच्या मापात फरक होत गेला. जसजसे खेळाचे नियम बदलत गेले तसतसे क्रीडांगणातील जागांची मापेही बदलत गेली. सुरुवातीला गोलच्या दोन्ही खांबांमधील अंतर १० याडांचे होते पण ते आता ४ यार्ड इतके मर्यादित केले गेले आहे. जेव्हा क्रीडांगणाची लांबी व रुंदी अनुक्रमे १०० यार्ड व ५५ ते ६० याडांवर नक्की करण्यात आली तेव्हा क्रीडांगणाची आतील आखणी कशी असते हे आकृती २·१ वरून दिसून येईल.

आकृती २·१ मध्ये दाखविल्याप्रमाणे १०० × ६० ही मैदानाची मर्यादा ठरली तेव्हा 'अ ब क ड' या लंबचौकोनात खेळ खेळला जाऊ लागला. म्हणजेच गोल रेषा ( Goal lines ) व बाजूच्या रेषा ( Side lines ) यांच्यामधला भाग ही क्रीडांगणाची मर्यादित जागा ठरली.

### गोल

( आकृती २·१ ) 'अब' व 'कड' यांना गोलरेषा म्हणतात, आणि 'अक' व 'बड' यांना बाजूच्या रेषा म्हणतात. दोन्ही बाजूंच्या गोल रेषांच्या मधोमध 'गोल' असतात. 'गोल' म्हणजे दोन खांब ४ यार्ड रुंदीवर दोन्ही बाजूला रोवलेले असतात. या खांबांची उंची ७ फूट असून त्यांची वरील टोके लाकडी पट्टीने जोडलेली असतात. या दोन खांबांमधील जागेला 'गोल' म्हणतात, आणि या जागेतून चेंडू मारून गोल करणे यातच या खेळाचे कौशल्य असते. गोलच्या पाठीमागील बाजू जाळीने बंद केलेली



आकृती २·२ : हॉकीचा गोल

असते व तिची तळाची बाजू ४ फूट गोलपर्यंत असून ती फूट ते दीड फूट रुंदीच्या फळ्यांनी बंद केलेली असते (आ० २·२ पाहा). गोलच्या दोन्ही खांबांच्या दोन्ही बाजूला गोल रेषांवर ५ व १० याडांवर खुणा केलेल्या असतात. त्यांचा उपयोग दंडकोपरा अगर कोपरा ( Penalty corner or corner ) मारण्यासाठी असतो. हे प्रत्यक्ष खेळाच्या वेळी विशेष लक्षात येईल. लंबचौकोन मैदानाच्या प्रत्येक कोपऱ्यावर निशाण रोवलेले असते व त्या प्रत्येक कोपऱ्याच्या दोन्ही बाजूंना ३ याडांवर खुणा केलेल्या

असतात. त्यांचा उपयोग ' कोपरा ' ( corner ) मारताना चेंडू कोठे ठेवावा हे दाखविण्यासाठी होतो.

## गोलार्ध

क्रीडांगणात गोलच्या खांबापासून १५ यार्डांच्या अंतरावर एक अर्धवर्तुळ करण्यात येई. याला ' गोलार्ध वर्तुळ ' (' D.' or Striking circle) म्हणतात. आकृती २·१ मध्ये दाखविल्याप्रमाणे क्रीडांगणाची अशी आखणी केली जाई. पण त्यात आता काही ठिकाणी किरकोळ फरक झाला आहे.

(आकृती २·१) पूर्वी बाजूरेषांपासून ५ यार्डांवर एक रेषा आखलेली असे. परंतु हल्ली ही रेषा वापरात नाही, कारण आता ' चेंडू फेक ' ( Ball Throw ) ची पद्धत प्रचारात नाही. तसेच वर म्हटल्याप्रमाणे गोलार्ध वर्तुळाचे अंतर पूर्वी जे १५ यार्डांचे होते ते आता १६ यार्डांचे केले आहे. पूर्वी ' दंडबुली ' (Penalty Bully) गोलाच्या मध्यापासून ५ यार्डांवरून केली जाई. पण आता दंडबुली अस्तित्वात नाही आणि त्याऐवजी दंडफटक्याचा समावेश केला आहे. त्यामुळे गोलापासून ५ यार्डांच्या ऐवजी ८ यार्डांवर खूण केलेली असते व तेथून हे फटके मारले जातात. पण या फटके मारणाऱ्याला आपले कौशल्य पणाला लावावे लागते.

गोलापासून २५ यार्डांवर गोलरेषांना समांतर व बाजूच्या रेषांना जोडणारी अशी रेषा दोन्ही बाजूंना मारलेली असते. पूर्वी ज्या भागात काही नियमांचे भंग झाले अगर चेंडू गोलरेषेच्या नुसता बाहेर गेला तरी या २५ यार्डांच्या रेषेवर ' बुली ' करण्यात येई, पण आता ही ' बुली 'ची पद्धत काढून टाकण्यात आली आहे. त्याऐवजी फटका किंवा सरक फटक्याचा ( Push ) फायदा मिळतो.

पूर्वी बाजूच्या रेषेच्या बाहेर ज्या बाजूच्या खेळाडूच्या दंडिकेला ( Stick ) लागून चेंडू जाईल त्याच्या विरुद्ध बाजूला चेंडूफेक करण्याचा फायदा मिळे आणि तो चेंडूफेक करताना इतर खेळाडूंना ५ यार्डांची जी रेषा असे त्याबाहेर चेंडूफेक होईपर्यंत राहावे लागे. पण आता चेंडूफेकीचा नियम बदलला असल्याने बाजूच्या रेषेवरून जेथून चेंडू बाहेर गेला असेल अगर नियमांचे उल्लंघन झाले असेल तेथून फटका मारला जातो.

दोन्ही गोलरेषांच्या मधोमध मैदानाचे दोन भाग दाखविणारी, दोन्ही बाजूंच्या रेषांना जोडणारी अशी मध्यरेषा आखलेली असते आणि तिच्याबरोबर मध्यावर एक छोटेसे वर्तुळ केलेले असते. त्या ठिकाणी 'बुली' करून खेळाला सुरुवात होते किंवा गोल झाल्यानंतर मध्यंतरानंतर पुन्हा खेळाची सुरुवात त्याच ठिकाणी ' बुली ' करून होते. अशा तऱ्हेने क्रीडांगणाची आखणी केलेली असते.

## साहित्य व साधने

वर आपणाला हॉकी क्रीडांगणासंबंधी माहिती मिळाली. आता प्रत्यक्ष खेळाला

काय साहित्य व साधनें लागतात ते पाहू.

दंडिका ( Stick )

या खेळासाठी मुख्यतः दंडिका व चेंडू यांची जरुरी असते. दंडिकेचे वजन व लांबी ही प्रत्येक खेळाडूच्या शरीरयष्टीवर अवलंबून असते. तरी ती सर्वसाधारणपणे खेळाडूच्या मांडीच्या मध्याला लागेल इतक्या उंचीची असावी. पण प्रत्येक खेळाडूची उंचीही असवड् यामुळे प्रत्येकाची दंडिका कमी-अधिक लांब असू शकते.

नियमाप्रमाणे दंडिकेचे कमीत कमी वजन १६ औंस व जास्तीत जास्त २८ औंस इतके चालू शकते. दंडिका ही लाकडीच असली पाहिजे. ती कोणत्याही धातूची करून वापरता येत नाही.

• बहुधा १८ ते २३ औंस वजनाची दंडिका वापरली जाते. यापेक्षा हलक्या दंडिकेचा विशेष फायदा होत नाही. आघाडीचे खेळाडू हलकी दंडिका वापरतात आणि पूर्णरक्षक ( Full Backs ) व गोलरक्षक जरा जड दंडिका निवडतात. दंडिकेचा पुढील भाग वाकविलेला असून तो एका बाजूला चपटा असतो. दंडिकेचे दोन प्रकार आहेत : एक इंग्लिश व दुसरा हिंदी. इंग्लिश दंडिका ॲश लाकडाची केलेली असते आणि तिचा पुढील बाक हिंदी दंडिकेपेक्षा कमी असतो. पण हिंदी दंडिका मलबरी किंवा तुतीच्या लाकडाची बनविलेली असते आणि तीच दंडिका हल्ली जगात सर्वत्र जास्त प्रमाणात उपयोगात आणली जाते असे आढळून येते.

• दंडिकेची निवड करताना तीन गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत. त्या म्हणजे उंची, वजन व तोल किंवा बॅलन्स. एका हातातून दुसऱ्या हातात सहजासहजी बदलता येऊन, हँडलजवळ दोन्ही हात धरून मोकळेपणाने ती वापरता आली म्हणजे तिला तोल ( Balance ) योग्य आहे की नाही हे कळून येते.

प्रत्येक दंडिका दोन इंची कड्या ( Ring ) मधून जाते की नाही हे तपासून घेतले पाहिजे, कारण जी दंडिका अशा कड्यांमधून जाऊ शकत नाही तिचा उपयोग, हॉकी-खेळाच्या नियमांप्रमाणे, सामन्यांच्या वेळी करू दिला जात नाही.

खेळाडूची उंची व दंडिकेची लांबी या दोन गोष्टी लक्षात ठेवून ती किती वर-खाली धरावी हे ज्याचे त्याने ठरवायाचे असते. दंडिकेवर हाताची पकड घट्ट पाहिजे. दंडिका कशी धरली जावी याला जास्त महत्त्व आहे.

दंडिका निवडल्यानंतर तिच्या वाकवलेल्या भागाला ( Blade ) बेलतेल ( Linseed oil ) लावून टणक रबरी अगर बुचाच्या चेंडूवर थोडे टोले मारावे आणि नंतरच ती वापरात आणावी. नवी कोरी दंडिका एकदम वापरू नये, कारण तेल लावल्या-शिवाय वापरल्यास तिचे तुकडे उडण्याचा संभव असतो. खेळून झाल्यावर दंडिका पुसून कव्हरमध्ये घालून ठेवावी.

## चेंडू

हॉकीच्या खेळाला जेव्हा सुरुवात झाली आणि त्या खेळात वाढ व सुधारणा होत गेली तसतसे त्याच्या साहित्यात फरकही होत गेले. सुरुवातीला दगड, नंतर जनावरांच्या शरीरातील चरबीचा गोळा, पुढे तांबे, मग रबर अगर दोऱ्याचे गुंडे यांचा चेंडूसारखा वापर केला जात होता. पण आता कोणत्या प्रकारचे चेंडू वापरावेत याबाबत सर्वत्र एकमत झालेले दिसून येते. टणक चेंडू म्हणजे बुचाचा अगर ज्याला रूढार्थाने 'सीझन-बॉल' म्हणतात, तो सरावाला वापरला जातो. तसेच वड्ड व टणक रबरी चेंडूचाही उपयोग केला जातो. त्याचप्रमाणे मैदान जेव्हा ओले असेल त्या वेळी अलीकडे सरावा-साठी प्लास्टिकचे चेंडूही पुष्कळ ठिकाणी वापरले जाऊ लागले आहेत. पण सामन्यां-साठी मात्र क्रिकेटच्या चेंडूप्रमाणे कातडी आवरणाचाच चेंडू वापरला जातो. कारण त्याप्रमाणे नियमही केला गेला आहे. सरावासाठी असले चेंडू वापरले तरी चालतात, पण खर्चाच्या दृष्टीने ते परवडत नाहीत म्हणून वापरत नाहीत इतकेच. हे चेंडू पांढऱ्या रंगाचे असतात. पांढऱ्या कातडी आवरणाच्या आत बूच व ट्वाईनचा दोरा वापरून चेंडूला टणकपणा आणला जातो. क्रिकेटच्या चेंडूप्रमाणे मात्र याला धारदार शिवण असत नाही.

हॉकीच्या चेंडूचे वजन कमीत कमी ५ १/२ औंस व जास्तीत जास्त ५ ३/४ औंस इतकेच असले पाहिजे. तसेच तो आकाराने ९ १/४ इंचापेक्षा मोठा अगर ८ ३/४ इंचापेक्षा लहान असता उपयोगी नाही. हे झाले चेंडूचे वर्णन.

दंडिका व चेंडू ही दोन मूलभूत साधने असली तरी त्यांच्या जोडीला इतर काही साहित्य व साधनांची देखील जरुरी असते. त्यांच्यासंबंधी पुढे माहिती दिली आहे.

## बूट

सुरुवातीसुरुवातीला बहुतेक खेळाडू अनवाणीच खेळत असत. पण जसजशी सुधारणा होत गेल्या व खेळात पायांना होणाऱ्या इजांमुळे त्यावर उपाय म्हणून बूट घालून खेळण्यास सुरुवात झाली आणि आता तर अनवाणी खेळण्यावर नियंत्रण घालण्यात आले आहे. म्हणूनच सर्रास बूटच वापरले जातात आणि त्याची उपयुक्तता सर्वांना पटली आहे. सर्वसाधारणपणे कातड्याचे, रबराचे अगर कॅन्व्हॉसचे बूट वापरतात. पण मैदाना-वर धावताना पाय घसरू नये व विशेषतः हिरवळीच्या मैदानावर धावण्याचा वेग कमी-अधिक करताना पकड घेता यावी म्हणून बुटाच्या तळव्यांना बाहेरच्या बाजूने पट्ट्या अगर बटणे मारलेली असतात. याला 'स्टड' म्हणतात. अशा तऱ्हेचे बूट हल्ली जास्त वापरात असलेले दिसून येतात.

बूट वापरण्यासंबंधीचा एक किस्सा सांगितला जातो. भारतीय खेळाडू (जेव्हा भारताची फाळणी झाली नव्हती तेव्हा) प्रथम अनवाणीच खेळत, कारण त्याचीच त्यांना सवय होती. पण जेव्हा ते परदेशाच्या दौऱ्यावर जाऊ लागले तेव्हा तिकडील खेळाडूंचे

अनुकरण म्हणून व त्यांच्याच जोडीला हवामानाचा विचार करून ते बूट घालून मैदानात उतरत. पण बूट घालून खेळण्याचा सराव नसल्याने त्यांना नीट पळताही येईना आणि चेंडूवर त्यांना ताबाही ठेवता येईनासा झाला. त्यामुळे खेळाच्या सुरवातीला १५/२० मिनिटे ते निष्प्रभ वाटत आणि त्यांच्या खेळाचा प्रभावही पडेना. तेव्हा एकेकजण बूट काढून आपल्या सवयीप्रमाणे अनवाणीच खेळू लागल्यावर ते प्रतिपक्षावर मात करू लागले आणि इतकेच नव्हे तर कित्येक वेळा त्यांनी गोल्सचा अक्षरशः पाऊस पाडला.

आता बूट घालून खेळण्याची सगळ्यांना सवय झाली आहे व नियमाचे बंधन पडल्यामुळे म्हणा तशी सवय करणे भागही पडते.

चेंडू हा खेळासाठी अत्यंत जरूरीचा आहे आणि दंडिका हे तर खरे साधन आहे. त्याशिवाय हॉकी खेळणेच शक्य नाही. तसेच बूट हे नियमामुळे आवश्यक झाले आहेत. या गोष्टींव्यतिरिक्त गोलरक्षकासाठी म्हणून काही खास साहित्याची जरूरी असते. ती म्हणजे—

## लेग गार्ड्स् किंवा पायाला बांधण्याचे पॅडस् अगर ' पायपट '

हे ' पायपट ' चामड्याचे असतात व ते गुडघ्याच्याही वरपर्यंत पोहोचतील इतके उंच असतात. ते सर्वसाधारणपणे क्रिकेट खेळामधील यष्टिरक्षकाच्या पॅडस्-सारखेच असतात. फक्त बुटांच्यावर येणारा भाग जरा रुंद असतो. गोलरक्षकाला सहजा-सहजी हालचाल करता येईल असे पायपट असले म्हणजे अडचण पडत नाही.

## ठोकर आवरण ( किकर्स )

बुटावर आच्छादन करण्यासाठी चामड्याचे हे पॅडसारखे आवरण असते. या ठोकर आवरणाचा मुख्य उद्देश, गोलरक्षकाला व्यवस्थितपणे चेंडूला ठोकर मारणे सुलभ व्हावे, हा असतो. म्हणूनच याचे नाव ' किकर्स ' असेच आहे. हे ठोकर आवरण बुटाला वरच्या बाजूला कातडी बंदांनी बांधतात, अगर पायपटालाच शिवलेले असते.

## बूट

इतर खेळाडूंपेक्षा गोलरक्षकासाठी जास्त जाड व टणक बूट असतात. या बुटांच्या अगल्या बाजूला लोखंडी पत्र्याने अंगठ्याजवळचा भाग तयार करतात. उद्देश हा की गोलमध्ये जोराने मारलेला चेंडू गोलरक्षकाला बुटाने सहज अडवता यावा आणि त्याचबरोबर त्याला चेंडूला ठोकरही मारता यावी. साध्या बुटाने हे करणे सोपे नसते म्हणून जाड बूट वापरतात.

## हातमोजे

काही गोलरक्षक बचावासाठी व सुरक्षिततेसाठी हातमोज्यांचा उपयोग करतात. पण ते सर्रास वापरावे व त्याची आवश्यकता असतेच असे नाही. तसेच हातमोजे वापरण्याला नियमांनी कोणतीही हरकत नाही.

### शिरस्त्राण ( हेल्मेट )

डोक्याच्या सुरक्षिततेसाठी शिरस्त्राण वापरले तरी चालते. पण त्याची सर्वांनाच आवश्यकता वाटते असे नाही. अलीकडे तोंडावर जाळीदार लोखंडी आवरण वापरण्याचा प्रघात पडू लागला आहे. पण हे वापरण्यास पंच संमती देतीलच असे नाही.

### गुप्तभाग सुरक्षा आवरण ( ॲबडॉमिनल पॅड )

सुरक्षिततेच्या दृष्टीने हे प्रत्येक गोलरक्षकाने वापरणे आवश्यक आहे.

हॉकीचा खेळ व्यवस्थितपणे खेळावयाचा असल्यास वरील साहित्यांची व साधनांची जरुरी आहे. तसेच जेव्हा सामने खेळले जातात तेव्हा प्रत्येक संघाला त्याचा गणवेश असणे जरूर आहे आणि त्याबाबत हल्ली नियमही केले गेले आहेत.

क्रिकेटचे बादशहा समजले जाणारे सर डॉन ब्रॅडमन म्हणत, "तुम्ही जर क्रिकेटियर असाल तर तसे तुम्ही दिसले पाहिजे आणि ती खेळातील पहिली आवश्यक गोष्ट आहे." क्रिकेटसंबंधीचे हे उद्‌गार हॉकीपटूंनादेखील तंतोतंत लागू पडतात. म्हणून हॉकी खेळाडूने दिसायला तरतरीत व हुषार दिसले पाहिजे आणि आपला वेषदेखील तसाच नीटनेटका ठेवणे अत्यंत जरूर आहे.

ही झाली हॉकीचे क्रीडांगण, त्या खेळाला लागणारे साहित्य, साधने व गणवेश वगैरेसंबंधी माहिती.



प्रकरण ३

# हॉकी खेळाचे नियम व त्यांत होत गेलेले बदल

इतर खेळांप्रमाणे हॉकी खेळालादेखील सुरुवातीसुरुवातीला नियम, नियंत्रण वगैरे काहीच नव्हते. हा खेळ केवळ मनोरंजन म्हणूनच मन मानेल तसा खेळला जात असे. पण जसजसा हा खेळ ठिकठिकाणी लोकप्रिय होऊ लागला तेव्हा या खेळात जास्त रंजकता, आकर्षण व चुरस निर्माण होण्याच्या दृष्टीने नियम व नियंत्रण असले तर बरे असे काही लोकांना वाटू लागले. त्यामुळे १९०९ मध्ये ४ देशांनी मिळून या खेळासाठी एक घटना तयार केली. पुढे १९२१ मध्ये या घटनेत बदलही झाला. पुढे १९२४ साली या खेळात जास्त गोडी वाटणाऱ्या देशांच्या प्रतिनिधींची पॅरिसमध्ये एक बैठक भरली होती. त्यात या खेळावर नियंत्रण राहावे म्हणून ( FIH ) ' फेडरेशन इंटरनॅशनल दि हॉकी ' ही संस्था स्थापन करण्यात आली. तेव्हापासूनच या खेळाचे नियम सर्वत्र सारखे करण्याचे कार्य सुरू झाले.

एकोणिसाव्या शतकात इंग्लंडमध्ये क्रिकेटचा चेंडू व ओक लाकडाच्या वाकड्या काठीने हा खेळ खेळत. त्या वेळी संघाची रचना व खेळाडूंची संख्या आजच्यापेक्षा पुष्कळच निराळी होती. प्रथम आघाडीला ८ पैकी आतल्या बाजूला ४, उजवी व डावी बाजू सांभाळण्यासाठी प्रत्येकी २, २ अर्धरक्षक व एक गोलरक्षक अशी खेळाडूंची विभागणी होती.

### रचना पद्धत

' मारा व पळा ' ( Hit and Run ) हाच खेळाचा भाग होता. त्या वेळी खेळाचे नियम असे निश्चित नसल्याने शारीरिक धक्काबुक्की व बळाचाच जास्त वापर करण्यात येई. आघाडीला ८ खेळाडू असल्याने बचाव कमकुवत होऊ लागला. तेव्हा आघाडीला ४, अर्धरक्षक ३, पूर्णरक्षक ३, व गोलरक्षक १ अशी १८९६ पर्यंत खेळाडूंची व्यवस्था होती. पण यातही फरक होत गेला. पुढे जेव्हा भारत या खेळात जसजसा भाग घेऊ लागला तेव्हापासून आणखी बदल होऊन आघाडीला ५, अर्धरक्षक ३, पूर्णरक्षक २ व गोलरक्षक १ अशी खेळाडूंची रचना झाली व तीच पुढे चालू राहिली. त्यालाच ' परंपरागत पद्धत ' म्हणतात. या पद्धतीने, आशियातील भारत, पाकिस्तान, मलेशिया, जपान वगैरे राष्ट्रांचे संघ खेळतात. पण अलीकडे काही राष्ट्रे ५–४–१–१ अशा रचनेने खेळू लागली आहेत. तसेच काही राष्ट्रे बचावाला जास्त मजबुती आणण्या-

साठी आघाडीला ४, अर्धरक्षक ४, पूर्णरक्षक २ व गोलरक्षक १, अशा रचनेने खेळतात. याला बचाव पद्धत असे म्हणतात. याव्यतिरिक्त केवळ पवित्रा बदलून खेळाडूंची पेरणी केल्याप्रमाणे काही संघ खेळतात. ते म्हणजे आघाडी ३, त्यामागे २, त्यामागे ४ अर्धरक्षक, १ पूर्णरक्षक व १ गोलरक्षक. युरोपात फुटबॉलचा खेळ खूपच लोकप्रिय आहे. तेव्हा फुटबॉलच्या धर्तीवरच हॉकीसंघाची रचना करण्याचे युरोपिअन संघ जास्त मान्य करीत. म्हणजे आघाडीला ४, अर्धरक्षक २, पूर्णरक्षक ४ व गोलरक्षक १. पण त्यांनाही ही रचना योग्य वाटेनाशी झाल्याने ते आता वर सांगितल्याप्रमाणे 'बचावपद्धत' किंवा 'परंपरागत पद्धतीचा' उपयोग करू लागले आहेत. ज्या संघाला प्रतिस्पर्धी संघ जास्त वरचढ वाटतो तेव्हा आघाडीला २, ३ अर्धरक्षक, ४ पूर्णरक्षक, गोलरक्षकाला साहाय्यक १ व गोलरक्षक १ अशी रचना करतात. रचनेचे हे जरी निरनिराळे प्रकार असले तरी प्रतिपक्षावर गोल करणे व आपला बचाव भक्कम मजबूत ठेवणे या दोन गोष्टी लक्षात ठेवूनच कोणताही संघ आपली रचना करतो. म्हणून अमुकच तऱ्हेची रचना ही योग्य की अयोग्य हे सांगणे कठीण आहे. पण अनुभवाने हेच सिद्ध झाले आहे की, ५–३–२–१ ही परंपरागत पद्धतच जास्त सरस व योग्य आहे. रचनेत काही जरी फरक होत गेला असला तरी ११ खेळाडूंचा संघ, हा नियम पक्का झाला व अद्यापिही तोच अस्तित्वात आहे.

## संघ

११ खेळाडूंचा संघ सामन्यासाठी निवडला व ते खेळाडू मैदानावर उतरल्यानंतर खेळाडूंत बदल करता येत नव्हता. म्हणून एकदोन खेळाडू वेळेवर मैदानावर आले नसल्यास त्यांची जागा मोकळी ठेवून असलेल्या खेळाडूंनीच सामना सुरू केला जात असे. तसेच जर एखादादुसरा खेळाडू जायबंदी झाला तर त्या खेळाडूला वगळून उरलेल्या खेळाडूंनीच पुढे खेळ चालू ठेवावा लागे असा पूर्वी नियम होता. पण अलीकडे या नियमात थोडी दुरुस्ती झाली आहे. या दुरुस्तीप्रमाणे प्रत्येक संघाला दोन खेळाडू, खेळाच्या वेळात जास्तीत जास्त दोन वेळा बदलता येतात आणि ते खेळाडू बदलण्यापूर्वी संघनायकाने पंचांना तसे कळवावे लागते.

जसजसा हा खेळ लोकप्रिय होऊ लागला तसतसे या खेळाचे अधिक नियम व बंधने अस्तित्वात येऊ लागली व कालमानपरिस्थितीप्रमाणे कमी-जास्त प्रमाणात त्यात फरकही होत गेले. पुढे या खेळासंबंधी एक मध्यवर्ती नियामक मंडळ स्थापले गेले, आणि त्यातर्फे करण्यात आलेले मूलभूत नियम साधारणपणे १८९६ ते १८९८ च्या सुमारास अमलात आले. पण त्यातही प्रत्यक्ष अनुभव व अडचणी येऊ लागल्या. त्याप्रमाणे अधूनमधून बदल करण्यात येत आहेत.

१८९६ मध्ये क्रीडांगणाची लांबी–रुंदी अनुक्रमे १०० व ६० यार्ड ही पक्की करण्यात आली व त्यात आजतागायत तरी बदल झालेला नाही.

## खेळाची वेळमर्यादा

प्रतिपक्षावर जास्त गोल करणे व यश मिळविणे हे या खेळाचे मुख्य ध्येय असते. त्यासाठी कालमर्यादा ठरविण्याचे नियम झाले. एकूण खेळ ७० मिनिटांचा असतो. त्यात ३५ मिनिटांचे दोन भाग केले जातात. पहिला ३५ मिनिटांचा खेळ झाल्यावर ५ मिनिटांच्या विश्रांतीनंतर ३५ मिनिटांचा दुसरा भाग सुरू होतो. मध्यंतरीच्या ५ मिनिटांच्या विश्रांतीच्या वेळात दोन्ही संघ आपापली बाजू बदलतात. या एकूण ७० मिनिटांत जर कुठल्याही बाजूचा गोल झाला नाही अगर गोलांची बरोबरी झाली तर पुन्हा १५ मिनिटे जादा वेळ देण्यात येतो आणि या जादा वेळात काहीच निर्णय लागला नाही तर आणखी १० मिनिटे असा जादा वेळ खेळण्यास दिला जातो. या वेळातही जर कोणीही सरशी करू शकला नाही तर निर्णय काय द्यावयाचा याबाबत केलेल्या नियमांत वेळोवेळी फरक होत केले आहेत. प्रथम अनिर्णित राहिलेला सामना दुसरे दिवशी अगर अन्य दिवशी पुन्हा संपूर्ण वेळ खेळला जाई, किंवा ज्या संघाचे जास्त 'कोपरे' होतील तो संघ विजयी असा निर्णय दिला जाई. पण तोही नियम बदलला गेला व अलीकडे ( टायब्रेकरचा ) 'कोंडीफोड' नियम अमलात आणला गेला आहे. या नियमामुळे खेळातल्या कौशल्यापेक्षा आता दैवाच्या अनुकूलतेवरच खेळाचे यश-अपयश ठरले जाते. परंतु बदलत्या परिस्थितीचा अभ्यास करूनही दैवाधीन गोष्ट आहे म्हणून चालणार नाही. तर पाकिस्तान, पश्चिम जर्मनी, हॉलंड, ऑस्ट्रेलिया वगैरे देशांतील खेळाडू कोंडी फोडण्यासाठी चेंडू मारण्यात अचूकता व कौशल्य किती पाहिजे याचा अभ्यास करून त्याप्रमाणे ते सराव करतात तसे भारतानेही केले पाहिजे.

खेळ कसा खेळावा, गोल झाला हे कसे ठरवावे, खेळाला मारक व बाधक असा खेळ खेळला जाऊ नये वगैरेसाठी केले गेलेले मूलभूत नियम अजून तरी बदलले गेले नाहीत. पण युरोपियन खेळाडूंना जड जात असलेल्या काही नियमांत बदल केले आहेत व ते आता आपल्याला जड वाटू लागले आहेत. पण ते नियम अमलात येण्यापूर्वीच जर त्याबद्दल योग्य ती काळजी घेऊन त्यांना वेळीच विरोध केला गेला असता तर त्याचा उपयोग झाला असता.

## बुली

आडदांड व जाडजूड शरीराच्या युरोपीय खेळाडूंना चपळाईने हालचाल करता येत नाही म्हणून १९५० साली गोलवळचे अर्धवर्तुळ १५ यार्डांऐवजी १६ यार्डांचे केले गेले. तसेच भारत व पाकिस्तान, या खेळात श्रेष्ठ ठरलेली ही दोन राष्ट्रे 'बुली' केव्हाच हारत नाहीत व चेंडूवर ताबा ठेवतात हे पाहून खेळाच्या सुरुवातीची, मध्यंतरानंतरची, गोल झाल्यानंतर पुन्हा खेळ सुरू करण्याच्या वेळची, 'नियमबाह्या'ची (Penalty) एवढ्याच 'बुली' ठेवण्यात आल्या. पुढे १९४९ साली २५ यार्डांवरील 'बुली' काढून टाकली आणि त्या जागी १६ यार्डांवरील फटका मारण्याचा नियम केला गेला. तसेच १९६३ साली नियमबाह्याची बुली काढून टाकली आणि त्या जागी

नियमबाह्य सरक फटका किंवा फटका ( Penalty push or stroke ) असा नियम करण्यात आला. या पाठीमागचा हेतू हाच की ' बुली ' करताना चकविण्याची कला जास्त रूढ होते व ते नियमात बसत नाही आणि धष्टपुष्ट खेळाडूंना ' बुली ' पेक्षा सरक व साधा फटका सहज जमतो. तेव्हा कोणत्याही ' बुली ' मुळे चकविण्याचे जे कौशल्य आहे त्याचा सहज फायदा घेता येऊ नये, तसेच त्यामुळे वेळेची बचतही होते. म्हणून ' सरक फटका ' हा ' बुली 'च्या ऐवजी ठेवण्यात आला आहे. त्याचप्रमाणे खेळाची गतीही वाढते. हा बदल १९५४ मध्ये करण्यात आला. याचप्रमाणे १९५५ मध्ये बाजूच्या रेषेबाहेर चेंडू गेल्यानंतर करण्यात येणारा ' चेंडू आत फेकणे ' अगर ' चेंडू सरपटविणे ' ( Roll–in ) हा नियम बदलून त्या जागी ' फटका ' किंवा ' सरक फटका ' याची तरतूद करण्यात आली.

वर नमूद केलेल्या ' बुली ' देखील काढून टाकाव्यात असे अलीकडेच प्रयत्न चालू झाले आहेत. त्याप्रमाणे आंतरराष्ट्रीय हॉकी फेडरेशनच्या नियम व संशोधन करणाऱ्या सबकमिटीने ' मध्य बुली ' ( Centre Bully ) देखील काढून टाकावी म्हणून आपला अहवाल सादर केला आहे. ' बुली 'ऐवजी साधा ' चेंडू मागे ढकलणे ' ( Back Pass ) एवढेच ठेवावे अशी या कमिटीने शिफारस केली आहे. या ' बुली ' काढून टाकण्यामुळे वेळेची बरीच बचत होईल असा या कमिटीने निष्कर्ष काढला आहे.

तसेच फटका मारणाऱ्या खेळाडूपासून ५ यार्डांच्या आत कोणीही राहावयाचे नाही हाही नियम रद्द होणार आहे.

वरील दोन्ही बदल प्रयोगाखातर निरनिराळ्या देशांकडे पाठविले आहेत आणि जर त्यांना एकमताने पाठिंबा मिळाला तरच ते अमलात येतील.

' कोपरा ' अगर ' दंडकोपरा ' मारण्यासंबंधीच्या नियमांतही आता बदल झालेला आहे. ' कोपरा ' ( यात दंडकोपराही आला ) मारण्याच्या वेळी बचाव करणाऱ्या संघाचे सर्व खेळाडू गोल रेषेच्या मागेच राहात. तसेच ' कोपरा 'चा चेंडू तसाच गोलकडे न मारता तो प्रथम अडवून स्थिर झाल्यानंतरच गोलाकडे मारावा लागे. ही पूर्वीच्या नियमातली तरतूद होती. पण बदललेल्या नियमाप्रमाणे कोपरा मारण्यापूर्वी बचाव करणाऱ्या संघाचे फक्त ६ खेळाडू गोलरेषेवर उभे राहात असून इतर खेळाडूंना मैदानाच्या मध्य-रेषेपलीकडे जावे लागते. त्याचप्रमाणे ' कोपरा फटक्याचा ' चेंडू प्रथम अडवावा लागतोच, पण तो पूर्ण स्थिर झालाच पाहिजे ही सक्ती नाही. पण तो न अडविता मात्र गोलात मारता येत नाही.

## कोंडीफोड

' कोंडीफोड ' हा एक मोठाच धक्कादायक नियम अस्तित्वात आला आहे. गुणांनी एखादा संघ कितीही चांगला असला तरी या ' कोंडीफोड ' नियमामुळे त्यालाही हार खावी लागते. वर म्हटल्याप्रमाणे ७० मिनिटे व त्यानंतर दिलेली जादा वेळ यात देखील

दोन्ही संघांची बरोबरीच झाली तर प्रत्येक संघातला गोलरक्षक आलटून पालटून एकाच गोलात उभा राहतो व त्याच्यासमोर ८ यार्डांवर केलेल्या खुणेवरून विरुद्ध बाजूचा एक खेळाडू आलटून पालटून ५ वेळा गोलात चेंडू मारतो आणि या ५ फटक्यांत ज्या संघावर जास्त गोल होतील तो संघ विजयी ठरतो. हे फटके एकाच खेळाडूला मारता येत नाहीत. तेव्हा असा ५ वेळा चेंडू मारून निर्णय लावतात त्यालाच 'कोंडीफोड' नियम म्हणतात. पूर्वीप्रमाणे सामना परत खेळणे अगर आणखी जास्त वेळ देणे हे आजकालच्या परिस्थितीत सर्वांना सोयीचे होत नाही आणि तसेच त्यासाठी जादा पैसा व शक्ती विनाकारण खर्च होते हा या नियमामागील दृष्टिकोण आहे. कोंडीफोडीसाठी मारले जाणारे फटके विशेष कौशल्याने मारावे लागतात आणि त्यासाठी खास मेहनत घेऊन तसा सराव करणे अत्यंत जरुरीचे आहे.

## बाजू बाहेर

तसेच 'बाजू बाहेर' ( OFF SIDE ) च्या नियमातही बराच बदल करण्यात आला आहे. हा फुटबॉलच्या नियमाप्रमाणेच केला आहे. पूर्वीच्या नियमाप्रमाणे प्रतिपक्षाच्या गोलजवळ त्यांचे ३ खेळाडू असावे लागत व तसे नसताना विरुद्ध पक्षाचा एखादा खेळाडू चेंडू येण्यापूर्वीच जर पुढे गेला असेल तर तो 'बाजू बाहेर' ठरविला जात असे. परंतु आता बदललेल्या नियमाप्रमाणे गोलजवळ दोन खेळाडू जरी असले तरी विरुद्ध पक्षाचा खेळाडू 'बाजू बाहेर' होत नाही.

अशा तऱ्हेचे हे नियम झाले, त्यात बदल होत गेले व अद्यापही होत आहेत. पण ज्या नियमात बदल होणार असतील त्यासंबंधी निरनिराळ्या राष्ट्रांकडून मते व सूचना प्रथम मागवून त्यावर विचार होऊनच मग मूळ नियमात बदल केले जावेत तरच ते रास्त होईल.

## नियमांचे पालन

या खेळाच्या नियमांसंबंधी सर्वसाधारण कल्पना वरील विवेचनावरून आली असली तरी प्रत्यक्षात खेळाच्या वेळी मैदान कसे आखले असावे व ते का? त्याचा उपयोग काय? या गोष्टी प्रत्येक खेळाडूला माहीत असणे जरूर आहे. त्याचबरोबर खेळ हा खेळासाठी आहे. त्यात जिद्द व चुरस असणे जरूर आहे, पण त्याच वेळी असूया, मत्सर, द्वेष या भावना मनात बाळगून जर खेळाडू खेळू लागले तर काही साध्या व मूलभूत नियमांचे त्यांच्याकडून पालन होत नाही आणि मग संघर्ष, वाद व काही वेळा मारामारीपर्यंत वेळ येते. अशा गोष्टी प्रत्येक खेळाडूने टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे. असभ्य व दांडगाईचे वर्तन करणाऱ्या खेळाडूला पंच पिवळे आणि हिरवे कार्ड दाखवून, ठराविक वेळ बाहेर बसवू शकतो आणि तो सांगेपर्यंत त्याला खेळता येत नाही. अशाच प्रकारची पुनरावृत्ती झाल्यास त्याला खेळातून बाद करण्याचा अधिकारही पंचांना असतो.

खेळताना ज्या मूलभूत नियमांचे पालन होणे जरूर आहे त्याची माहिती खेळाडूंना असणे अत्यंत जरूर आहे. तेव्हा या नियमांचे पालन होते की नाही हे कसे ठरवायचे व त्याला काय यंत्रणा आहे ? याबाबत ' पंच व त्यांचे कार्य ' या स्वतंत्र प्रकरणात ऊहापोह केला आहे.

● ● ●

प्रकरण ४

# शारीरिक क्षमता, मूलभूत नैपुण्य आणि खेळाची सुरुवात

आतापर्यंत हॉकी खेळासंबंधीचा इतिहास, लागणारे क्रीडांगण, साहित्य व साधने वगैरेसंबंधीची बरीच माहिती करून घेतली. आता हा खेळ कुणाला खेळता येईल, त्याला कशा तऱ्हेचे खेळाडू असणे जरूर आहे व खेळ सुरू केव्हा व कसा करतात याबद्दल थोडी माहिती पाहू.

## आवड

कुठलाही खेळ खेळावयाचा झाल्यास तो खेळणाऱ्याच्या अंगी हौस, चिकाटी, जिद्द, शिकण्याची इच्छा व तयारी असणे अत्यंत जरूर आहे. नाही तर घरच्यांचे अगर सोबत्यांचे दडपण, भीड वगैरेमुळे एखादा खेळावयाला तयार झाला तर त्याला खेळात गोडी लागणार नाही. म्हणून अमूक एक खेळ खेळायचा तर त्या खेळाबाबत मनातून खरी आवड व हौस असणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे.

## मानसिक व शारीरिक तयारी

खेळ खेळण्याची मनातून तयारी झाली की, आपोआप त्यात गोडी निर्माण होते. त्यानंतर शरीरात जर तितकी ताकद, चिवटपणा व चपळाई नसेल तर ती मिळविण्यासाठी साहजिकच त्या खेळाडूची नजर चौफेर शोध घेऊन त्या दृष्टीने तयारी करण्यासाठी त्याच्या मनाची तयारी होते.

हॉकीचा खेळ हा गतिमान असून त्यात एक प्रकारची ईर्षा असते, आणि त्यासाठी मानसिक व शारीरिक हालचालीसंबंधी जलद निर्णय घेण्याची सवय करावी लागते, आणि ही सवय हळूहळू जसजसा खेळाचा सराव होतो तसतशी वाढत जाते. हे सगळे जरी खरे असले तरी प्रत्येक खेळाडूने शरीर मजबूत व टणक ठेवण्यास शिकले पाहिजे. त्यासाठी त्याला थोडासा तरी व्यायाम करणे हे आलेच. हा खेळ गतिमान असल्यामुळे गती अगर वेग घेण्यासाठी प्रत्येकाला धावण्याचा सराव हा करणे जरूर आहे. त्याबरोबर इतर अवयवांना देखील व्यायाम मिळून सर्व शरीर सदैव जागरूक व तत्पर राहण्यासाठी उड्या, वजन उचलणे वगैरेसारखे व्यायामाचे प्रकार करण्याची तयारी पाहिजे. अशा तऱ्हेची तयारी असल्यानंतर कोणता व्यायाम किती व

कसा करावा याबाबत शिक्षकांकडून योग्य त्या सूचना घेणे महत्त्वाचे आहे.

क्रिकेटमध्ये दोन संघांमध्ये जास्ती धावसंख्या करून प्रतिपक्षावर मात करण्याची चुरस व डावपेच असतात. पण हॉकी खेळात प्रतिपक्षावर गोल करून विजय मिळविणे हेच ध्येय असते आणि त्यासाठी चुरस व धडपड चाललेली असते.

## दृष्टी

प्रत्येक खेळाला लागणारी मूलभूत व अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणणे ' उत्तम दृष्टी ' ही होय. आणि त्याच्याच जोडीला त्वरित प्रतिक्रिया ( Quick Reflexes ) असणे अत्यंत जरुरीचे आहे. दृष्टी मंद होऊ नये म्हणून डोळ्यांची योग्य ती काळजी घेणे जरूर आहे. माफक प्रमाणात व्यायाम करावा. अती व्यायामाने दृष्टीवर परिणाम होतो हे अनुभवाने सिद्ध झाले आहे. तुम्हाला उत्तम खेळाडू व्हावयाचे असेल तर नहमी ' निर्मळ राहा ' म्हणजेच तुम्ही चारित्र्याने शुद्ध असले पाहिजे. कारण तुमच्या शरीरातील स्नायू व इतर अवयव या दोन्हींची बरोबर सांगड घातली गेली तर तुमच्या हातून खेळ उत्तम होईल, आणि ही सांगड घालण्याकरिता मेंदूचा सगळीकडे योग्य तो ताबा राहील अशी क्षमता असणे जरूर आहे. म्हणून प्रत्येकाने आपल्या शरीरातील सर्व अवयव व्यवस्थित ठेवण्याची दक्षता ठेवली पाहिजे. ज्याची शारीरिक तन्दुरुस्ती जितकी अधिक तितका त्याचा खेळाचा जास्ती उपयोग होतो म्हणून जेव्हा एखाद्याला दमल्यासारखे वाटते तेव्हा त्याच्या शरीरातील रक्त व प्राणवायू कमी झाला आहे ही सूचना असते. त्यासाठी त्याच्या स्नायूंना व इतर अवयवांना योग्य ती बळकटी टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने त्याला आहार घेणे जरूर असते. म्हणजे केव्हा, कसा व किती आहार घ्यावा याकडेही लक्ष देणे अत्यंत जरुरीचे आहे, कारण त्यावर खेळाडूंच्या अंगातली ताकद, जलद धावण्याची तयारी व शक्ती या गोष्टी अवलंबून असतात. शारीरिक तन्दुरुस्ती व क्षमता या गोष्टी सहजासहजी व आठ-पंधरा दिवसांत तयार होऊ शकत नाहीत. त्यासाठी सतत सराव करणे जरूर आहे. पण कोणतीही गोष्ट आत्मसात करावयाची झाली तर त्यामागे आपले तन आणि मन संपूर्णपणे लावले पाहिजे.

खेळ खळण्याची मनाची तयारी झाली की मग तो कसा खेळावा, आत्मसात कसा करावा, त्याच्यात नैपुण्य कसे मिळविता येईल याकडे आपोआपच लक्ष केंद्रित होऊ लागते.

## दंडिकेवरील पकड

हॉकी हा खेळ व्यवस्थित खेळावयाचा झाल्यास प्रत्येक खेळाडूला त्याच्या हातात योग्य वाटेल व सहज वापरता येईल अशी दंडिका असणे जरूर आहे. रोज त्याने मैदानावर आल्यावर प्रथम धावणे व इतर व्यायाम थोडा वेळ तरी केला पाहिजे. का की, त्याची गात्रे त्यामुळे मोकळी होतात. दंडिका निवडल्यानंतर ती सहजासहजी हातात कशी खेळविता येईल याचे धडे घेणे जरूर आहे. दंडिका धरताना तिची चपटी

बाजू आत राहील अशी धरली पाहिजे. केव्हाही दंडिकेच्या चपट्या बाजूनेच चेंडू मारला पाहिजे, नाही तर ते नियमबाह्य ठरेल. दंडिका धरताना हँडलच्या वरच्या बाजूला चार-पाच बोटे सोडून डावा हात व त्याखाली दोन-तीन बोटे सोडून उजवा हात, अशा तऱ्हेने ती धरावी. उभे राहताना उजवा पाय मागे व डावा पाय साधारण ५–६ इंच दूर आणि उजव्या पायाला जवळ जवळ ४५ अंशांचा कोन होईल अशा तऱ्हेने पुढे ठेवावा. कमरेत थोडे पुढे वाकून खेळावयाचा पवित्रा घ्यावा.

दंडिका हातात धरली, आता चेंडू दंडिकेने मारता आला पाहिजे. चेंडू काय, सहज मारता येईल ही कल्पना सगळ्यांच्या डोक्यात असते, पण ते वाटते तितके सोपे नाही ! आपल्या पायापासून जवळ जवळ १८ ते २४ इंच अंतरावर चेंडू ठेवून दंडिका उजव्या खांद्यापर्यंत मागे नेऊन जोराने चेंडू मारण्यासाठी पुढे आणावी. सुरुवातील चेंडूला दंडिका लागणार नाही अगर टोला बसला तर तो त्याच्या डोक्यावरच बसेल, आणि चेंडू अगदी हळू पुढे ढकलला जाईल. पण चेंडू जोराने मारता येण्यासाठी दंडिकेने बरोबर त्याच्या बैठकीपाशी आघात करावा लागतो. हे नियमित सरावाने साध्य होते.

## उंच दंडिका ( Stick )

याच संदर्भात हेही लक्षात ठेवले पाहिजे की, चेंडू मारण्यापूर्वी अगर तो मारल्या-नंतर चेंडू मारणाऱ्या खेळाडूची दंडिका त्याच्या खांद्याच्या वर, मागे किंवा पुढे, जाता उपयोगी नाही. खांद्यावर दंडिका गेली की ती नियमबाह्य झाली म्हणून पंच निर्णय देतात. तेव्हा सुरुवातीपासूनच नियमाबरहुकूम खेळण्याची सवय ठेवली पाहिजे. सुरुवातीला यातील बारीकसारीक बाबींकडे लक्ष दिल्यास पुढे जड जात नाही. प्रथम थोडे कठीण वाटते, पण सरावाने ते अंगवळणी पडते. तेव्हा उंच दंडिका घेऊ नये. यासाठी दंडिकेला द्यावयाच्या झोक्यावर नियंत्रण ठवता आले पाहिजे. म्हणून ' उंच दंडिका ' न करता चेंडू योग्य तऱ्हेने मारता यावयाचा झाल्यास कोपरापासूनचा हात व मनगट यांच्या ताकदीने तो मारता आला पाहिजे. खांद्याचा जोर या कामी उपयोगी पडत नाही.

## निरनिराळे फटके

चेंडू जोराने मारताना, पुढे ढकलताना, चकविताना ( Passing ) अगर अन्य हालचालींसाठी दंडिकेवर खेळाडूच्या हाताची पकड पक्की असली पाहिजे हे महत्त्वाचे आहे. प्रत्येक खेळाडूची पकड निरनिराळी असू शकेल. पण ती पक्की करण्यासाठी तशा तऱ्हेने सराव करण्याची अत्यंत जरुरी आहे. चकविणे ( Passing ), उलटसुलट नेणे ( Dribbling ), झटक फटका मारणे ( Flicking ), सरक फटका (Push), उचल फटका ( Scoop ), पॅलट फटका (Reverse stroke), डाव्या अगर उजव्या बाजूला चेंडू मारणे या सर्वांचा निरनिराळ्या पकडीत समावेश होतो. ज्याप्रमाणे क्रिकेट-

मध्ये ' रीस्ट वर्क ' म्हणजे मनगटाच्या करामतीवर चेंडू मारण्याचे कौशल्य असते तद्वतच हॉकीमध्येही ' मनगटी फटका ' ( Wrist stroke ) किंवा ' पलट फटका ' ( Reverse stroke ) हा प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यासाठी जास्त उपयोगी पडतो.

### पदलालित्य ( Foot-work )

नवीन खेळाडूला चेंडू जोराने योग्य तऱ्हेने व योग्य दिशेला मारता न येण्याचे कारण ' पदलालित्याचा ' ( foot-work ) अभाव हेच आहे. म्हणजेच त्याने कसे उभे राहिले पाहिजे, पाय कसे ठेवावेत व त्यांची हालचाल कशी करावी यासंबंधीचे शिक्षण देणे अत्यंत जरुरीचे आहे. जर तुम्ही अयोग्य तऱ्हेने उभे असाल तर वेळ, दिशा व अचूकपणा या गोष्टी तुमच्या टोल्यात येणार नाहीत. यासाठी सतत सरावाची पण ती योग्य मार्गदर्शनाखाली, जरुरी आहे.

उत्तम ' फुटवर्क ' म्हणजे पदलालित्य व दंडिकेची अचूक हालचाल या गोष्टी पाहतानादेखील समाधान वाटले पाहिजे व मनोरंजनही झाले पाहिजे. या दृष्टीने हॉकीचे जादूगार कै. मेजर ध्यानचंद, कै. रूपसिंह, कै. के. डी. सिंग ऊर्फ ' बाबू ' आणि बलबीरसिंग ( सीनियर ) यांचे उदाहरण देता येईल.

प्रत्येक ठिकाणी ' सराव ' हा शब्द येतो. त्यासाठी सरावाची उत्तम पद्धत म्हणजे खेळ खेळणे, परंतु प्रत्येक खेळाडूच्या हालचाली, कक्षा वगैरेंची प्राथमिक माहिती झाल्याशिवाय प्रत्यक्ष खेळ खेळून सराव होणार नाही हेही तितकेच खरे आहे.

मैदानावर खेळाडूंच्या प्रत्यक्ष जागा ठरलेल्या असाव्यात व त्या जागेच्या खेळासाठीच सरावाची जरूर असते. पण त्या जागेच्या खेळाला लागणारे कौशल्य व नैपुण्य सरावानेच साध्य होते. आता गोलरक्षकाकडे पुष्कळ वेळा एकही चेंडू येत नाही, मग त्याला सराव कसा होणार ? हा प्रश्न पुढे येतो. तेव्हा अशा काही विशिष्ट जागा असतील त्यासाठी स्वतंत्र सराव करणेच जरुरीचे असते.

तेव्हा सर्व तऱ्हेच्या सरावांच्या मागे प्रत्येक सराव करण्याचा उद्देश, मनापासून तो करण्याची इच्छा व त्यासाठी श्रम आणि गोडी घेऊन करण्याची तयारी या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत.

दंडिकाकौशल्य व पदलालित्य यांच्यात प्रगती करण्यासाठी ' बॉटलरन ' चा रोज सराव केला पाहिजे. साधारण ५ यार्ड अंतरावर एक अशा ८-१० बाटल्यांची एक ओळ तयार करून त्यांमधून शक्य तितक्या चपळाईने चेंडू उलटसुलट नेण्याचा सराव करावा. अशा तऱ्हेने बाटल्यांच्या मधून चपळाईने उलटसुलट चेंडू नेताना जेव्हा डावी व उजवी बाजू सारखी सावरावी लागते त्यासाठी दंडिकेवर पकड कशी असावी व चेंडूवर ताबा कसा ठेवावा लागतो याचा उत्तम सराव होतो.

रोजचा स्वतंत्र सराव करताना प्रथम हळूहळू खेळत खेळत आपोआप वेग वाढत जातो आणि मग प्रत्यक्ष खेळ खेळताना वेगाची मर्यादा कशी व किती असावी याचा

अंदाज घेतो. यासाठी चेंडूची हालचाल करण्याचे एक तंत्र आहे, आणि त्यात निरनिराळे प्रकार आहेत. ते आपण पुढे पाहूच. 'केंद्रमध्य' ( Centre Forward ) असेल तर तो डाव्या अगर उजव्या बाजूच्या खेळाडूकडे अगदी सहजपणे चेंडू कसे सहज ढकलू शकतो हे पाहण्यात खरी मजा वाटते. त्या दृष्टीने कै. ध्यानचंद व बलबीरसिंग यांचा खेळ आदर्श केंद्रमध्य असा होता.

सरावाच्या वेळी काय किंवा सामना खेळताना काय, नेहमी खेळाडूचे लक्ष चेंडूवर केंद्रित झाले पाहिजे हे महत्त्वाचे आहे. त्याचबरोबर प्रतिस्पर्धी काय व कशी हालचाल करतात इकडेही चाणाक्षपणे नजर असली पाहिजे आणि त्यावरूनच चेंडू कुठे मारावयाचा याचा निर्णय घ्यावयाचा असतो.

वर दंडिकेच्या पकडीच्या संदर्भात ज्या 'चकविणे', 'सरळ फटका मारणे', 'झटक फटका मारणे' वगैरे ५-६ प्रकारांचा उल्लेख आला त्यांचा या हालचालीच्या संबंधात विशेष सविस्तरपणे ऊहापोह करणे जरूर आहे.

### 'सरक आणि झटक फटका'

चेंडू जोराने ढकलणे अगर कोलणे असा याचा थोडक्यात अर्थ होतो. पण या दोन्हीतही थोडा फरक आहे. झटक फटक्याने चेंडू जास्त जोराने जातो आणि चेंडूच्या पाठोपाठ खेळाडू जात नाही, परंतु सरक फटका दिला की चेंडूच्या गतीत खेळाडूला पुढे जाता येते. अशा तऱ्हेने चेंडूला दिशा देणे सुलभतेने व्हावयाचे झाल्यास कसे उभे राहावयाचे याला महत्त्व आहे. यासाठी चेंडू खेळाडूच्या जवळ असला पाहिजे. मनगटाची पकड घट्ट करून चेंडूच्या मागे दंडिका लावून दंडिकेच्या वरच्या भागावर शक्यतो जास्त भार देता आला तर वरील दोन्ही तऱ्हेचे फटके मारणे जमते. या खेळात सरक फटका सर्वांत जास्ती वेळा उपयोगात आणतात. सरक फटका मारताना चेंडू उजव्या पायासमोर परंतु डाव्या पायाच्या उजव्या बाजूला साधारण १८ ते २४ इंच अंतरावर ठेवावा. दंडिकेचा चपटा वळलेला भाग चेंडूच्या बैठकीला लावून पुढे वाकून, डाव्या पायावर जोर देऊन चेंडू जोराने पुढे ढकलावा. असा सरक फटका शक्य तो उजव्या बाजूकडेच मारतात.

धावता धावता डावीकडून उजवीकडे चेंडू देताना झटक फटका मारतात. उद्देश हा की शक्य तितक्या जलदीने चेंडू पुढे मारणे, पण तो फार दूर जाता उपयोगी नाही, कारण त्यामुळे चेंडूवर ताबा ठेवणे कठीण जाते.

सरक फटका व झटक फटका यांचे टोले जवळजवळ सारखेच असले तरी सरक फटक्यात चेंडू मैदानावरून सरपटतच जातो. परंतु झटक फटक्यात चेंडू साधारण गुडघ्याइतक्या वरून जातो. सरक फटक्यापेक्षा झटक फटक्यात मनगटांना जास्त जोर द्यावा लागतो. सरक फटका हा अचूक व आखूड अंतरात चकविणे झाल्यास, तसेच चेंडूची दिशा बदलताना फार उपयोगी पडतो. झटक फटका हा चेंडू जलद जाण्यासाठी

आणि विशेषत: गोलच्या जवळ असताना गोल करण्यासाठी फार महत्त्वाचा आहे.

### उचल फटका

उचल फटक्याने चेंडू हवेत फेकला जातो. तो प्रतिस्पर्ध्यांच्या डोक्यावरून त्यांच्या आवाक्याबाहेर जाण्यासाठीच मारला जातो. उद्देश हा की, चेंडूवर प्रतिस्पर्ध्यांना ताबा मिळू नये. उचल फटका हा झटक फटक्याचा दुसरा प्रकार म्हणता येईल. अडचणीच्या वेळी उचल फटका चांगला उपयोगी पडतो. पुष्कळदा बगलेवर खेळणारे खेळाडू ( wingers ) या फटक्याचा उपयोग करतात. यासाठी दंडिकेचे टोक चेंडूच्या मागे टेकवून दंडिका साधारण आडवी करून चेंडू शक्यतो हवेत उंचीवरून रेटावयाचा असतो. असा उंचीवरुन चेंडू टाकल्यामुळे आपल्या अगर प्रतिस्पर्ध्यांपैकी कुणालाच चेंडू वरच्या-वर मारणे शक्य नसते. हा फटका मारताना पाय कसे असावे हे नक्की नसते, पण ते जुळवून न ठेवता रुंदच ठेवावे लागतात. दंडिकेचा वरचा भाग खेळाडूच्या शरीराजवळ व चपटा भाग चेंडूच्या खाली टेकवून उजव्या बाजूला सारी शक्ती लावून चेंडू टाकला जातो.

### उलटसुलट नेणे

शरीराची चतुराईने हालचाल करीत पळत पळत चेंडू डाव्याउजव्या बाजूने पुढे नेत नेत प्रतिस्पर्ध्यांना चुकवीत मार्ग काढणे व त्याच वेळी चेंडूवरही ताबा ठेवणे, याच क्रियेला ' चेंडू उलटसुलट नेणे ' (Dribbling) असे म्हणतात. दंडिकाकौशल्य उत्तम असणे म्हणजेच चेंडू उलटसुलट नेण्यावर प्रभुत्व असणे असेच म्हणता येईल. प्रत्येक खेळाडूला फटका मारता आला पाहिजे त्याचप्रमाणे त्याला उलटसुलट चेंडू नेण्याचेही कसब अवगत असले पाहिजे. ' अर्धरक्षक ' आणि आघाडीवीर अधूनमधून झटक फटका मारतात..पण त्यांना चेंडू उलटसुलट नेता येणे आवश्यक आहे. एका प्रसिद्ध हॉकीपटूने म्हटले आहे की, " पदलालित्य आणि शरीराच्या चपळ हालचालीशिवाय चेंडू उलट-सुलट नेण्याची धडपड करणे म्हणजे पेट्रोलशिवाय मोटार चालविण्यासारखे होईल ! "

चेंडू उलटसुलट नेताना वैयक्तिक कौशल्य दाखविण्याचा मोह होतो आणि म्हणूनच हा मोह टाळून संघाच्या यशाकडे लक्ष केंद्रित करून संयोजनाने (Combination) खेळले तर जास्त फायद्याचे होईल हे प्रत्येक खेळाडूने लक्षात ठेवणे महत्त्वाचे आहे.

### चेंडू अडविणे ( Fielding the Ball )

ज्याप्रमाणे चेंडू मारणे म्हणजे हिट करणे, हे वाटते तितके सोपे नाही, त्याप्रमाणेच चेंडू अडविणे हेही सोपे नाही. शक्य तो चेंडू दंडिकेनेच अडविता आला पाहिजे. पण हाताने अडविणे हे नियमात असले तरी ते नेहमीच शक्य नसते. आघाडीच्या खेळाडूंना

तर दंडिकेनेच चेंडू अडविण्याची सवय पाहिजे, परंतु पूर्ण रक्षकांच्या दृष्टीने चेंडू अडविणे हे फारच महत्त्वाचे आहे. चेंडू अडविताना दोन्ही पाय जुळवून, शरीराचा भाग पुढे झुकवून, वाकून उभे राहावे. दंडिकेवर हाताची चांगली पकड असावी. उजवा हात दंडिकेच्या वरच्या टोकापासून साधारण १८ इंच खाली व डावा हात त्याच्यापासून साधारण ३/४ इंच वर असावा. दंडिका आपल्या पायासमोर धरली पाहिजे व दंडिकेच्या पुढील चपटया भागावर चेंडू अडला पाहिजे. त्यासाठी चेंडू अडविताना चेंडूवर पूर्ण लक्ष पाहिजे. चेंडू उजव्या बाजूला अडविणे झाल्यास दंडिकेच्या मागे उजवा पाय ठेवावा व तो डाव्या पायापासून ३/४ इंच दूर असावा. तसेच डाव्या बाजूला आलेला चेंडू अडविताना दंडिकेच्या मागे डावा पाय व त्याच्यामागे ४/५ इंचावर उजवा पाय ठेवून चेंडू रोखावा.

प्रतिपक्ष्याचे आघाडीचे खेळाडू जोराने येत असता त्यांनी जोराने मारलेला चेंडू रोखण्याचा अगर अडविण्याचा कसोशीने प्रयत्न न करता जर चेंडू तसाच म्हणजे गतीत असतानाच परत मारण्याचा प्रयत्न करणे नेहमी धोक्याचे असते. कारण चेंडू मारला गेला नाही अगर अडला गेला नाही तर तो वेगाने गोलाकडे जातो आणि त्याच वेळी पूर्णरक्षक पुढे आले असल्याने गोल उघडा पडलेला असतो आणि प्रतिपक्षाला ही चांगली संधी मिळते. म्हणून अशा वेळी दंडिकेवर अवलंबून राहणे हे केव्हाही आत्महत्या करण्यासारखेच आहे. तेव्हा चेंडू हातानेच शक्यतो अडविणे योग्य ठरते. परंतु चेंडू हाताने अडविला तरी तो स्थिर पाहिजे. पण दंडिकेने अडविणे हे धोक्याचे आहे किंवा कसे हे प्रत्येक खेळाडूने तारतम्यानेच ठरविले पाहिजे आणि ते सरावाने व अनुभवानेच शिकता येईल.

## चकविणे किंवा ' डावलणे ' ( Passing )

प्रतिस्पर्ध्याला ' डावलून ' किंवा ' चकवून ' चेंडू पुढे काढणे यालाच ' पासिंग ' म्हणतात. म्हणून चेंडूवर ताबा ( Ball control ) व चेंडू उलटसुलट नेणे, या दोन क्रिया चांगल्या अवगत असल्याशिवाय ' चकविण्यामध्ये ' ( Passing ) तरबेज होता येत नाही. डावलण्याच्या क्रियेत दोन व्यक्तींचा संबंध असतो : डावललेला चेंडू घेणारा आणि तो डावलून देणारा. पण काही वेळा दोन्हीपेक्षा अधिक खेळाडूही यात गोवले जातात. चेंडू देणारा व घेणारा या दोघांवर सारखीच जबाबदारी असते. प्रतिपक्षाला चुकवून चेंडू देणाऱ्याने चेंडू घेणाऱ्याला तो कसा व कुठे द्यावयाचा हे ध्यानपूर्वक लक्षात ठेवले पाहिजे, नाही तर चेंडू काढून घेऊन सहज पुढे ढकलण्यात काहीच अर्थ नसतो. डावललेला चेंडू घेणाऱ्यानेदेखील दिलेला चेंडू आपल्याला घेता येईल की नाही याचा तत्काळ अंदाज घेतला पाहिजे. आपलाच खेळाडू जवळ आहे म्हणून त्याच्याकडे चेंडू ढकलणे यात काही कौशल्य नाही. प्रतिस्पर्ध्यावर मात करणे म्हणजे त्याला चकवून चेंडू पुढे काढणे होय. यासाठी चेंडूवर चांगला ताबा ठेवता आला पाहिजे.

म्हणून दंडिकेचे पुढचे चपटे टोक चेंडूजवळ जमिनीवर सतत राहिले पाहिजे. प्रतिस्पर्धी किती व कसा वेगाने येतो व त्याच्या शरीराचा तोल कुणीकडच्या बाजूला आहे हे चटकन लक्षात घेऊन बरोबर त्याच्या विरुद्ध बाजूने चेंडू चकवून पुढे काढता आला पाहिजे, किंवा जिथे जागा दिसेल तेथून. पुष्कळदा प्रतिस्पर्ध्याच्या पायामधूनही चेंडू पुढे काढला पाहिजे. यासाठीच चेंडू त्याच्या आवाक्याबाहेर राहील अशाच अंतरावर असला पाहिजे. म्हणून पुढे काढण्यापूर्वी तुमच्या प्रतिस्पर्ध्याला पुढे यायला लावा आणि जेव्हा तो अंगावर येतो त्याच क्षणी चेंडू चकवून पुढे ढकलणे योग्य ठरते. त्याचबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, नेहमी अशा वेळी चेंडू पुढेच ढकलला पाहिजे. डावी-कडून उजवीकडे चेंडू मारणे हे कठीण असते, पण सरावाने ते सुलभ होऊ शकते.

चकविण्यासेही ( Passing ) पुष्कळ प्रकार आहेत. जसे, सरळ, चौकोनी, मागे ढकलून, त्रिकोणी, इंग्लिश ' यू ' अक्षराच्या तऱ्हेने चकविणे ( U-Pass ), तिरकस, कुत्र्याच्या चालीप्रमाणे ( Dog Leg Pass ), इंग्लिश ' डब्ल्यू ' अक्षराप्रमाणे हालचाल करून ( W-Pass ) वगैरे. हे प्रकार केव्हा व कसे उपयोगात आणावयाचे हे प्रत्यक्ष खेळाचा सराव व बरेच सामने खेळल्यानंतर सहज कळू लागते.

## चेंडूवरील ताबा ( Ball Control )

चेंडूवर ताबा मिळविणे ही गोष्ट चांगला सराव केल्याशिवाय सहजसाध्य होण्यासारखी नाही. यासाठी चेंडूवर व प्रतिस्पर्ध्यांच्या हालचालीवर सतत नजर ठेवली पाहिजे म्हणजे चेंडूवर ताबा मिळविणे व तो टिकविणे तसे कठीण जात नाही. यासाठी उलट-सुलट चेंडू नेणे हे चांगल्या तऱ्हेने करता आले पाहिजे.

## चेंडू हिरावून घेणे ( Tackling )

टॅकलिंग म्हणजेच प्रतिस्पर्ध्याकडून चेंडू हिरावून घेण्याचा प्रयत्न करणे होय. ही कृती आत्मसात करणे म्हणजे हॉकीमधील पुष्कळसे श्रेय मिळविण्यासारखे आहे. परंतु ज्या वेळी आपण काय करावे हा संभ्रम निर्माण होतो त्या वेळी चेंडू हिरावून घेण्यासाठी धडपड व्यर्थ असते. कारण प्रतिस्पर्धी याच संधीची वाट पाहात असतो. चेंडू अमूक तऱ्हेनेच हिरावून घ्यावा असे सांगून हे कळणार नाही अगर साध्यही होणार नाही. त्याला सराव, अनुभव व वैयक्तिक दृष्टी आणि तारतम्य या गोष्टींचीच आव-श्यकता आहे.

ज्या प्रतिस्पर्ध्यांच्या हातात चेंडू असतो त्या वेळी चेंडू पाठीमागून हिरावून घेणे ( Tackling Back ) हे आघाडीच्या खेळाडूंचे कर्तव्य असते. पण पुष्कळदा याकडे दुर्लक्ष केले जाते. पाठीमागून हिरावून घेण्यामुळे प्रतिस्पर्ध्याचा अंदाज चुकतो आणि त्यामुळे आपल्या खेळाडूंना त्याचा फायदा मिळतो. हिरावून घेण्याच्या निरनिराळ्या पद्धती आहेत, पण सर्वांचा उद्देश एकच असतो की, प्रतिस्पर्ध्याचा चेंडूवरील ताबा

वाळवून तो आपल्या ताब्यात कसा घेता येईल! म्हणून कोणत्याही पद्धतीने हिरावून घेण्याची क्रिया केली तरी मूलभूत गोष्टी लक्षात ठेवणे अत्यंत जरुरीचे आहे. त्यापैकी महत्त्वाच्या आहेत त्या खाली दिल्या आहेत.

### वेळ व संधी

चेंडूचा ताबा मिळविण्याची आलेली संधी ताबडतोब घेतली पाहिजे व त्यासाठी अचूक वेळेलाच चेंडू हिरावण्याचा प्रयत्न केला गेला तरच त्याचा उपयोग होतो. ज्या वेळी प्रतिस्पर्ध्याचा चेंडूवरील ताबा ढिला होत आहे हे लक्षात आले की तीच संधी साधली पाहिजे. त्यापूर्वी जर हिरावून घेण्याचा पवित्रा घ्याल तर प्रतिस्पर्ध्याला सावध केल्यासारखे होईल आणि त्यामुळे तो चेंडूवरील ताबा ढिला होणार नाही याचा कसोशीने प्रयत्न करील. परंतु याला अपवाद म्हणजे गोलार्ध वर्तुळातील ( डी ) जागा. या ठिकाणी प्रतिस्पर्ध्यांपैकी कुणालाही चेंडू गोलामध्ये मारण्याला वाव मिळू नये म्हणून वर म्हटल्याप्रमाणे संधीची वाट पाहात न बसता त्वरित चेंडू हिरावून घेण्याच्या मागेच लागले पाहिजे.

### निश्चय

चेंडूवर ताबा मिळविण्याचा निश्चय झाला पाहिजे व त्या दृष्टीने जलद हालचाल होणे जरूर असते.

### शारीरिक वजन व बळ

ज्या वेळी प्रतिस्पर्धी चेंडू घेऊन येत आहे आणि त्याला चकविणे व त्याच्याकडून चेंडू हस्तगत करणे जरूर आहे त्या वेळी आपले शारीरिक वजन व बळ यांचा उपयोग करून प्रतिस्पर्ध्याला पद्धतशीरपणे कसा रोखता येईल याचा विचार केला पाहिजे आणि

### दृष्टी

सतत दृष्टी चाणाक्ष असली पाहिजे आणि ती चेंडूवरच केंद्रित झाली पाहिजे, नाहीं तर प्रतिस्पर्धी आपल्या शरीराचा उपयोग करून तुम्हाला बनविण्याचा डाव करील.

या वरील निवेदनावरून चेंडू हिरावून घेणे हा प्रकार किती महत्त्वाचा आहे हे लक्षात आले असेलच.

### अचानक धडक मारणे ( Lunge )

काही वेळा चेंडूची हालचाल करताना अचानक जोराने धडक मारून पुढे जाणे भाग पडते, त्यालाच लन्ज ( Lunge ) असे म्हणतात. अशा वेळी डावा पाय पुढे ठेवून डावा हात हँडलच्या मागे ठेवून चेंडू प्रतिस्पर्ध्याच्या दंडिकेवरून पुढे ढोलवून

चेंडूचा ताबा मिळविण्यासाठी पुढे घुसावे लागते. प्रतिस्पर्ध्याला काही झाले तरी चेंडू मिळता उपयोगी नाही हा यामागील खरा उद्देश असतो.

चेंडू हिरावून घेणे यशस्वी झाले म्हणजे त्या खेळाडूची जबाबदारी संपत नसते. तर त्याने चेंडू आपल्यापैकी कोणत्या खेळाडूकडे टोलविला तर त्याचा योग्य उपयोग होईल याचा झटकन निर्णय घेऊन तशी लगेच कृती केली पाहिजे.

वर वर्णन केलेल्या सर्व गोष्टींची माहिती प्रत्येक खेळाडूला असली पाहिजे आणि त्या दृष्टीने त्याने हॉकी खेळ खेळणे सुरू केले म्हणजे, आपल्याला कोणती जागा योग्य आहे व ज्या ठिकाणी आपण आपले कौशल्य दाखवू शकू याचा अंदाज घेऊन त्याप्रमाणे खेळात रस घेतला पाहिजे. नवख्या खेळाडूला खेळाची सुरुवात करताना या खेळात काय काय गोष्टी असतात व हा खेळ कसा असतो याचे थोडक्यात चित्रण वरील गोष्टींवरून समजले असेल. म्हणजे या खेळात काय आहे, कोणती अंगे आहेत, कशाला व कसे प्राधान्य दिले पाहिजे याचा हा ऊहापोह केला आहे.

या खेळात प्रत्येक बाजूला एकूण ११ खेळाडू असतात आणि आतापर्यंत रूढ असलेल्या व भारत ज्या पद्धतीने खेळत आला आहे त्याप्रमाणे त्या जागांची नावे अशी आहेत.

एक गोलरक्षक, दोन पूर्णरक्षक ( उजवीकडील एक व डावीकडील एक ) ही बचावाची फळी. तीन अर्धरक्षक ( उजवा, मधला व डावा ) अशी मधली बचावाची फळी आणि पाच आघाडीचे खेळाडू. ( डावी बगल, डाव्या बगलेतील आतला खेळाडू, केंद्रमध्य ( मधली जागा ), उजव्या बगलेतील आतला खेळाडू आणि उजवी बगल ).

## खेळाची सुरुवात

मधल्या रेषेवर आघाडीचे दोन्ही बाजूंचे खेळाडू त्यांच्या त्यांच्या जागांवर उभे राहतात. मधले दोन्हीकडचे खेळाडू म्हणजे केंद्रमध्य मधल्या रेषेच्या मध्यभागी एकमेकांकडे तोंड करून उभे राहतात. तेथे केलेल्या छोट्या वर्तुळावर चेंडू ठेवला जातो. त्या ठिकाणी आपल्या दंडिकेने तीन वेळा एकमेकांच्या दंडिकेवर हळूच आघात करतात म्हणजे दंडिका आपटतात. तिसरा आघात झाला की त्या दोन केंद्रमध्यांपैकी कोणीतरी एक चपळाई करून चेंडू प्रथम ढकलून विरुद्ध बाजूकडे नेण्याचा प्रयत्न करतो आणि अशा रीतीने खेळाला सुरुवात होते. या तीन वेळा केलेल्या दंडिकेच्या आघात किंवा आपटण्याच्या क्रियेलाच ' बुली ' करणे म्हणतात.

प्रतिस्पर्ध्यावर गोल चढविणे व सरशी मिळणे हाच या खेळाचा मुख्य उद्देश असतो आणि त्यामुळेच चुरस व स्पर्धा निर्माण होते.

वर वर्णन केलेल्या सर्व खेळाडूंना खेळताना जे नियम लागू आहेत त्यापैकी गोलरक्षकाला या नियमांत थोडी सवलत असते.



आकृती ४·१ : खेळाला सुरुवात ' बुली 'ने होते.

गोलरक्षकाला पायपट वापरता येतात. तो पायाने चेंडू अडवू शकतो व ठोकर (लाथ) मारू शकतो. तसेच हातानेही चेंडू अडवू शकतो. परंतु चेंडू झेलू शकत नाही. या सर्व सवलती फक्त तो जेव्हा ' डी ' किंवा गोलार्ध वर्तुळात असतानाच त्याला दिल्या जातात. जर या वर्तुळाच्या बाहेर गोलरक्षक गेला तर तो इतर खेळाडू-प्रमाणच गणला जातो आणि त्यामुळे त्याला ' गोलरक्षक ' या नात्याने मिळणाऱ्या सवलती तो घेऊ शकत नाही.

● ● ●

## प्रकरण ५

# शारीरिक व मानसिक तयारी, व्यायाम, सराव व प्रशिक्षण

हॉकीचा खेळ हे मनरंजनाचे साधन तर आहेच, परंतु या खेळात शारीरिक व मानसिक असे दोन्ही व्यायाम आपोआपच होत असतात. त्याचा शरीरातील प्रत्येक मांसपेशीवर परिणाम होतो, हातापायांची हालचाल जलद होऊ लागते आणि त्याबरोबर प्रत्येक वेळी सावध व हुषार राहण्याची प्रवृत्ती आपोआपच वळावते. शारीरिक क्षमतेबरोबरच तत्काळ निर्णय घेण्याची शक्ती वाढते. परिस्थितीचे आकलन झटकन करता येऊ लागते. प्रतिपक्षाने चढाई करण्याअगोदरच चटकन निर्णय घेऊन खेळातले आपले कौशल्य दाखविण्याची संधी मिळते. चेंडू हातात आल्याबरोबर तो प्रतिपक्षाच्या बाजूला नेऊन गोल कसा करता येईल या विचाराचा क्षणात निश्चय करून तशा तऱ्हेने डावपेच केले पाहिजेत असे पक्के मत होते. म्हणजेच मानसिक विकासही या खेळात होत असतो. येथे चातुर्य व सावधानपणा यांना विशेष महत्त्व आहे, याची पूर्ण जाणीव येते व त्याप्रमाणे खेळाडूत प्रगती होत जाते.

चेंडू कसा व किती जोराने मारावा, उलटसुलट नेऊन चकवीत पुढे कसा नेता येईल, आलेल्या अडचणी व अडथळे यांना पार करून किंवा त्यांच्यावर मात करून कसे झटकन निसटता येईल वगैरे गोष्टी सफाईने करता येऊ लागल्या म्हणजे खेळात एक प्रकारची रंजकता येते आणि खेळाडूत जास्त उत्साह निर्माण होतो.

### सराव

परंतु या सगळ्या गोष्टी साध्य होण्यासाठी खेळातील प्रत्येक हालचालीचा योग्य तो व भरपूर सराव करणे अत्यंत जरूर आहे. खेळातच नव्हे तर कुठल्याही क्षेत्रात सराव किंवा सवय ही अत्यंत आवश्यक बाब आहे. संगीतात गाण्याचा अगर वाद्यांचा योग्य व भरपूर ' रियाज ' म्हणजेच सराव केल्याशिवाय त्यात यश मिळणे कठीण असते, तद्वतच या खेळातही आहे.

तेव्हा हा सराव कसा करावा यासाठी मार्गदर्शनाची अत्यंत जरुरी आहे, यात दुमत नाही, परंतु मार्गदर्शन करणारा शिक्षक अगर कोच हा सूचना देईल पण त्या अमलात आणून काटेकोरपणे त्याचा सराव करणे हे प्रत्येक खेळाडूचे कर्तव्य आहे. कुठलीही गोष्ट चांगल्या तऱ्हेने यावी ही इच्छा मनात असली तर त्यासाठी भरपूर

मेहनत घेऊनच सराव करण्याची तयारी पाहिजे. उगाच झटपट रंगारी होऊ म्हटले तर ते शक्य नाही!

खेळात प्रगती करण्याच्या ज्या काही पायऱ्या अगर टप्पे आहेत त्या प्रत्येकाचे सराव करण्याचे वेगवेगळे प्रकार आहेत.

## फटका मारणे

चेंडूला टोला मारणे किंवा हिट करणे हे सोपे नाही, हे मागे एके ठिकाणी म्हटले आहे. तर त्यासाठी चेंडू पुढे ठेवून जोराने मारण्याचा रोज १५/२० मिनिटे तरी सराव करणे जरूर आहे. फटका मारता येणे हा या खेळाचा जणू पाया आहे. तेव्हा पाया कच्चा राहून चालणार नाही. दोन खेळाडूंनी साधारण २५ ते ३० फूट अंतरावर एकमेकांसमोर उभे राहून एकमेकांकडे चेंडू मारत राहावा; किंवा आपल्या घराच्या अंगणात, कंपौंडमध्ये एखाद्या भिंतीपासून १५/२० फुटांवर उभे राहून भिंतीकडे जोराने चेंडू मारण्याचा सराव करावा. असा सराव नियमितपणे करीत गेल्यास फटका चांगल्या तऱ्हेने मारता येऊ लागतो.

फटका मारताना डावा हात वरच्या टोकापासून ४ इंच खाली व त्याच्या मुठीच्या खाली उजवा हात अशी दंडिकेवर पकड ठेवावी. चेंडू १२ ते १८ इंच इतका दूर ठेवून डावा पाय पुढे व उजवा पाय त्याच्यापासून थोड्या अंतरामागे त्यामुळे शरीराचे वजन उजव्या पायावर असेल व प्रत्यक्ष चेंडू मारताना ते वजन डाव्या पायावर आपोआप बदलले जाईल. डाव्या पायाचा अंगठा ज्या दिशेला चेंडू जाणार तिकडे असावा व उजवा किंचित आडवा राहिला पाहिजे. डावा खांदा देखील चेंडू जाणाऱ्या दिशेकडे वाकलेला असावा. फटका मारताना शरीराचा भार दोन्ही पायांवर टाकून दोन्ही टांगा सरळ असल्या पाहिजेत. दंडिका मारण्यासाठी उचलताना तिचा कोणताही भाग खांद्याच्यावर जाणार नाही व मारल्यानंतरही पुढे खांद्यावर जाणार नाही ही काळजी घेतली पाहिजे. या सर्व गोष्टी लक्षात ठेवूनच सराव करणे महत्त्वाचे आहे.

एक हाताने केव्हाही फटका मारू नये. फक्त धावत असाल किंवा चुकवीत असाल त्याच वेळी एका हातातल्या दंडिकेचा उपयोग करावा. ५ ते २० फूट अंतरावर एक काठी अगर क्रिकेट स्टंप रोवून त्याला फटका मारून चेंडू मारण्याचा प्रयत्न करावा.

## चेंडू आडविणे किंवा तटविणे

मारलेला चेंडू आडविणे हीही गोष्ट सोपी नाही आणि त्यासाठी देखील सराव पाहिजे. चेंडू अडविताना दंडिका आपल्या पायांसमोर धरली पाहिजे आणि दंडिकेच्या खालच्या पुढच्या चपट्या भागानेच चेंडू आडविला पाहिजे. त्यासाठी चेंडूवर तीक्ष्ण नजर पाहिजे. चेंडू उजव्या बाजूला आडविण्याच्या वेळी दंडिकेच्या पाठीमागे उजवा पाय असावा आणि तो डाव्या पायापासून २/४ इंच दूर ठेवावा. तसेच चेंडू डाव्या बाजूला

आडवावयाचा झाल्यास दंडिकेच्या मागे डावा पाय व त्याच्या मागे २/४ इंचावर उजवा पाय ठेवून चेंडू रोखावा.

चेंडू आडविणे हा खेळातला एक महत्त्वाचा भाग समजला जातो. जमिनीसपाट चेंडू आला तर तो कसा रोखावा हे वर सांगितले, पण जर तो वर उडून आला तर तो वरच्या वर दंडिकेनेच अडविता आला पाहिजे. पण कोणत्याही परिस्थितीत दंडिका खांद्यावर जाता उपयोगी नाही. हातानेही चेंडू आडविता येतो, पण आडवून तेथल्या तेथे थांबला पाहिजे. तो नुसता आडवावयाचा, तो झेलावयाचा नसतो. तसेच हाताने आड-विल्यावर चेंडूला उसळी मारून दूर जाऊ देऊ नये, नाही तर प्रतिपक्ष त्याचा नक्कीच फायदा घेऊ शकेल.




आकृति ५·१ : चेंडू आडविणे व दिशा बदलणे

अर्धरक्षक व पूर्णरक्षक यांना चेंडू आडविण्यात विशेष प्रावीण्य मिळविणे जरूर असते. आघाडीच्या खेळाडूंना तर सरळ दंडिका व उलट्या बाजूने दंडिका फिरवून चेंडू आडविता आला पाहिजे.

पळता पळता चेंडू आडविणे आणि तशीच त्याची दिशा बदलणे यासाठी खास सराव करणे जरूर आहे. ( आकृती ५·१ पाहा ).

आकृतीत दाखविल्याप्रमाणे १६ यार्डांच्या वर्तुळावर सारख्या अंतरावर अ, ब, व क असे तीन खेळाडू उभे राहून त्यांनी वर्तुळावर धावत राहावयाचे व एकमेकाकडे

धावता धावता चेंडू मारावयाचा. अशा तऱ्हेने मारलेला चेंडू आडवून लगेच दिशा बदलून चेंडू टोलविण्याचा सराव चांगल्या प्रकारे होऊ शकतो.

चेंडू मारणे व आडविणे यांचा सराव करताना तो योग्य ठिकाणी मारला जातो की नाही याच्याकडे लक्ष ठेवले पाहिजे व त्याचा सराव होणे जरूर आहे. त्याचबरोबर चेंडू आडविला तर आपल्याच ताब्यात ठेवता आला पाहिजे. म्हणजेच चेंडूवर ताबा ठेवणे हे महत्त्वाचे आहे. कारण चेंडू नुसता आडवून त्यावर ताबा ठेवता आला नाही तर प्रतिस्पर्ध्याला त्याचा फायदा मिळेल. म्हणून कोणत्याही बाजूने चेंडू आला तरी तो



आकृति ५·२ : चेंडूवर ताबा व दिशा बदलणे

आडवून लगेच दुसरीकडे मारता अगर ढकलता आला पाहिजे. यासाठी आकृती ५·२ मध्ये दाखविल्याप्रमाणे १६ यार्डांचे एक वर्तुळ करून त्यावर ८ ते १० खेळाडू उभे राहून प्रत्येकाने आपल्या समोरच्या खेळाडूकडे चेंडू मारावा व त्याने तो आडवून लगेच परतवावा. तसेच अधूनमधून इतर खेळाडूंकडेही मारावा. असे करण्याने चेंडूवर दृष्टी राहून, तो आडवून समोर अगर दिशा बदलून मारता येण्यासाठी काय करावे म्हणजे त्यावर ताबा कसा राहील या सर्वांचा सराव होतो.

## कौशल्य

हॉकी खेळाचे खरे कौशल्य चकविणे व हालचाल यावर विशेष अवलंबून असते ज्याप्रमाणे प्रतिस्पर्ध्यांचा आडथळा जास्त अगर भक्कम असेल त्याप्रमाणे चकविणे

कमी अधिक गतीने हालचाल करणे हे खेळाडूने ठरवावयाचे असते. यासाठी, नागमोडी अगर 'झिगझॅग' पद्धतीने चकवीत जाणे योग्य होते. म्हणून त्याचा सराव करणे जरूर आहे. भारतीय खेळाडू आखूड टप्प्याने चकविण्यात यशस्वी ठरले आहेत व तोच जास्त फायदेशीर पडतो. म्हणून त्याचाच सराव जास्त केल्यास ते श्रेयस्कर. कै. ध्यानचंद व त्यांचे बंधू कै. रूपसिंह हे दोघे आखूड टप्प्याच्या चकविण्याच्या क्रियेचा पाठपुरावा करीत व त्यातच त्यांनी प्रावीण्य मिळविले होते.

प्रतिपक्षाला चेंडू घेऊन जाण्यात अडथळा कसा उत्पन्न करता येईल यासाठी प्रत्येकाने आपापल्या बुद्धीने व कुवतीप्रमाणे कौशल्य दाखवून चेंडू घेण्यासाठी धडपड केली पाहिजे. यासाठी प्रत्यक्ष खेळ खेळूनच सराव होऊं शकतो. अडथळा आणणे म्हणजे धक्काबुक्की अगर मारामारी करणे नव्हे हे लक्षात ठेवले पाहिजे.

आकृति ५·३ : झिगझॅग पद्धत

### "बुली"

'बुली' करण्याचेही एक तंत्र आहे आणि हे सरावाशिवाय आत्मसात होणे कठीण आहे. कै. ध्यानचंद यांचा 'बुली' करण्यात इतका हातखंडा होता की, ३० 'बुलीं'पैकी ते हमखास २५ बुलींत चेंडूवर ताबा मिळवीत. 'बुली' जिंकण्यासाठी खेळाडूची मानसिक दृढता उत्तम असावी लागते. 'बुली' करून चेंडूवर ताबा मिळविला तरी त्याचा उपयोग योग्य तऱ्हेने केला पाहिजे, म्हणजे प्रतिस्पर्ध्यांना चकवून तो आपल्या खेळाडूकडे ताबडतोब दिला पाहिजे. स्वतःचे कौशल्य दाखविण्याचा मोह टाळला पाहिजे. नाहीतर चेंडूवर प्रतिस्पर्धी लगेच ताबा मिळवतील. म्हणून चेंडूची दिशा कशी बदलावी याचे शिक्षण जरूर पाहिजे. तसेच प्रतिस्पर्ध्यांच्या रिंगणाजवळ चेंडू गेला म्हणजे जास्त चकविणे अगर उलटसुलट करण्यात वेळ न घालविता तो रिंगणातून स्वतः अगर आपल्या संघातील अन्य खेळाडूला गोलात ताबडतोब कसा मारता येईल याचा विचार डोक्यात ठेवूनच हालचाल केली पाहिजे. यासाठी आकृती ५·४ मध्ये दाखविल्या- [ आकृती ५·४ : बुली करणे →

प्रमाणे चेंडू घेऊन आठ खुंट्यांमधून पळत जाण्याचा सराव केला तर गोल मारणे सुलभ होऊ शकते. हा एक सराव करण्याचा प्रकार सांगितला, पण हमलास त्यात यश मिळेल की नाही हे प्रत्यक्ष खेळतानाच कळून येते आणि तेव्हाच तंत्राचा व पद्धतीचा बदल करणे न करणे हे खेळाडूंनी ठरवावयाचे असते.

## शिस्त

इतर खेळांप्रमाणे या खेळातही 'शिस्त' ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे. उर्मटपणा, मारामारी, पंचांच्या निर्णयावर वाद घालणे व त्यावर नाराजी व्यक्त करणे अगर अपशब्द बोलणे याला आळा घातला पाहिजे. मैदानावर उतरल्याबरोबर प्रत्येक खेळाडूने आपण एकटेच खेळत असून खेळाची सारी मदार आपल्यावरच आहे, तसेच आपणच उत्तम खेळाडू आहोत हे सर्व समज प्रथम मनातून काढून टाकले पाहिजेत. हल्ली आपल्या खेळाडूंत वैयक्तिक ताकदीवर व कौशल्यावर गोल करण्याची प्रवृत्ती वाढत आहे आणि ती मोठी घातक आहे. हा त्यांच्यातील अहंपणाच त्यांना दगा देतो !

## खेळाडूंचे प्रशिक्षण

खेळाडूंच्या निरनिराळ्या स्पर्धा व परीक्षा घेऊन त्यात मिळविलेले प्रावीण्य यावरून त्यांच्यात झालेली प्रगती अगर विकास नोंद करून ठेवणे जास्त फायद्याचे ठरते. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही आहे की, आपल्याकडील शिक्षक व तज्ज्ञ (!) समजले जाणारे यांच्याकडे हा दृष्टिकोणच नाही. परंतु शाळा-कॉलेजांतील खेळाडूंच्या अंगच्या गुणांची अगर कौशल्याची वेळोवेळी नोंद ठेवली व त्यांना प्रोत्साहन देत गेले तर खेळाडूंत नक्कीच सुधारणा होईल.

खेळाडूंच्या अंगच्या सुप्त कार्यक्षमतेला वाढीला लावून त्यांना योग्य ते मार्गदर्शन करणे हा 'कोचिंग'चा उद्देश आहे. खेळाडूंच्या संख्येपेक्षा प्रत्येक खेळाडूतल्या गुणांना व कौशल्याला योग्य ते वळण लावले पाहिजे. त्यांच्या अंगच्या गुणांकडे वेळीच जागरूकतेने लक्ष देणे अत्यंत महत्त्वाचे आहे. नाही तर कोणीही काहीही करावे व आंधळ्या-सारखे खेळत राहावे असा प्रकार होईल. प्रत्येक खेळाडूची शारीरिक क्षमता सुधारण्या-साठी त्याला प्रशिक्षण देताना धारेवर धरावे असा याचा अर्थ होत नाही. म्हणून खेळाडूंची प्रगती मोजण्यासाठी काहीतरी निकष वेळोवेळी लावले पाहिजेत. अशा तऱ्हेने निकष लाव-ण्याने दोन गोष्टी साध्य होतात. एक म्हणजे प्रत्येक खेळाडूला आपण इतरांच्या मानाने कोठे आहोत हे कळणे सोपे होते आणि दुसरे म्हणजे शिक्षकाला व कोचला कोणत्या खेळाडूकडे किती लक्ष द्यावे लागणार आहे व कोणत्या सुविधा अगर मार्गदर्शन वा साहाय्याची जरुरी आहे हे समजून येते.

ज्याप्रमाणे डॉक्टर औषध देण्यापूर्वी रोगाचे निदान निरनिराळ्या तपासण्या व चाचण्यांच्या द्वारे करतो तद्वतच खेळाडूंच्या अंगची क्षमता व कुवत ही प्रत्येकाची

चाचणी, मोजमापे, प्रश्नोत्तरे, साधने व आयुधांचा केला जाणारा वापर वगैरे गोष्टींवरून कळून येते. खेळाडूंच्या अंगचे कसब अजमाविण्यासाठी त्याची कसोटी व मूल्यमापन करून त्याचे वर्गीकरण करणे जरूर आहे. यासाठी त्याच्या अंगचे कौशल्य, त्याचे ज्ञान, आणि त्याने केलेली प्रगती या गोष्टी लक्षात घेणे जरूर आहे. कारण खेळाडूच्या दृष्टिकोणातून ते अत्यंत फायदेशीर आहे, असा अनुभव आहे.

## खेळाची पद्धत

खेळाची पद्धत व त्याचे शिक्षण या दृष्टीने चेंडू उलटसुलट घेणे, पुढे काढणे, मारणे, गोलात फटकाविणे यांना फार महत्त्व आहे. कारण या गोष्टी ज्या प्रमाणात आत्मसात केल्या जातील त्या मानाने ' फिल्ड हॉकीत ' प्रगती करणे सोपे जाते. म्हणजे जो खेळाडू वरील चार प्रकारच्या खेळांत प्रगती करील त्याचा खेळ नक्कीच सफाईदार व उत्तम होईल हे निश्चित.

खेळाडूच्या पळण्याची क्षमता काय आहे यावरच खेळातील त्याची जागा अवलंबून राहील. पुष्कळ वेळा सामने जिंकण्यासाठी ' कोपरे 'च उपयोगी पडतात. परंतु पुष्कळांचा असा समज आहे की, कोपऱ्यामुळे गोल करणे फारसे सोपे नसते. परंतु कॉर्नर मारण्याचा जर सतत पद्धतशीर सराव केला तर गोल करण्यासाठी कोपरा हा एक हुकमी एक्का ठरू शकेल, म्हणून त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

## संघशक्ती

टीमवर्क म्हणजेच संघशक्ती व उत्तम धोरण किंवा योजना या केव्हाही विजयाकडे नेण्यासाठी महत्त्वाच्या बाबी आहेत. प्रेक्षकांच्या दृष्टीने दंडिकालालित्याचा खेळ पाहावयाला चांगला असतो. परंतु संघाचे यश केव्हाही खेळाडूच्या नुसत्या वैयक्तिक कौशल्यावर नसून सर्व खेळाडूंच्या एकत्रित कौशल्यावर असते. खेळाचे ध्येय काय तर प्रतिपक्षावर गोल लावणे आणि हे साध्य करण्यासाठी वैयक्तिक श्रमांचा जास्त उपयोग करून चालणार नाही. म्हणून व्यक्तिगत खेळ किंवा ' गॅलरीगेम ' शक्य तितका टाळला पाहिजे.

उत्तम शारीरिक तन्दुरुस्ती आणि चिवटपणा या गोष्टी प्रत्येक खेळाडूला जरूरीच्या आहेत. आपण कोणत्या जागेवर खेळत आहोत, त्याचे वैशिष्ट्य, मर्यादा व जबाबदारी काय याचे प्रत्येक खेळाडूला ज्ञान असणे अत्यंत महत्त्वाचे आहे. प्रत्येक खेळाडूने शक्यतो सर्वांशी व विशेषतः आपल्या नजीकच्या खेळाडूंशी सतत संपर्क राखला पाहिजे.

## काही मूलभूत गोष्टी

गती, चपळाई, एकमेकांतील सामंजस्य आणि तंत्र या सगळ्या गोष्टी उत्तम

तन्हेने आत्मसात केल्या पाहिजेत. चेंडू केव्हाही जमिनीवरच असला पाहिजे. उडता चेंडू मारणे धोक्याचे व आत्मघातकी ठरते; हे पक्के लक्षात ठेवले पाहिजे. उडता चेंडू अंडरकट किंवा उचल फटका मारणे या गोष्टींना पंचांकडून मनाई केली जाईल हे नेहमी ध्यानात ठेवणे जरुरीचे आहे.

शारीरिक शक्ती ही पहिली पायरी आहे. ती कायम राखण्यासाठी रोजची दिनचर्या नियमित पाहिजे. खाणे, पिणे, झोपणे, व्यायाम व खेळाचा सराव या गोष्टी वेळच्या वेळी व नियमित ठेवल्यास खेळावर त्याचा नक्की परिणाम होतो असे पुष्कळ तज्ज्ञ व अनुभवी खेळाडूंचे मत आहे.

शिक्षक चांगला तरबेज असला की शिष्यही चांगले तयार होतात. चांगल्या घराच्या भिंती व आधार जसे पक्के असतात व कठीण परिस्थितीशी ते मुकाबला करतात तद्वतच चांगल्या व माहितगार शिक्षकाच्या हाताखाली शिक्षण घेऊन त्याचा सराव केल्याने कोणत्याही परिस्थितीवर मात करण्याचे मनोधैर्य व विश्वास निर्माण होतो.

## क्रियात्मक शिक्षण

प्रत्येक खेळाडूला दिलेले प्रशिक्षण हे क्रियात्मक असले पाहिजे, आणि त्याचे महत्त्वाचे तत्त्व हे की, खेळाडूने खेळताना डोके शांत ठेवले पाहिजे. डोक्यात खेळाव्यतिरिक्त इतर कोणतेही विचार, काळज्या, चिंता असता उपयोगी नाही. मन कसे प्रसन्न असले पाहिजे. दृढनिश्चयाने मैदानात उतरले पाहिजे. खेळताना शरीर ढिले ( Relax) ठेवले पाहिजे.

● साहस, सतर्कता, निर्णयशक्ती, तत्काल योजना व आखणी करण्याची क्षमता, चेंडूवर सतत लक्ष केंद्रित करणे, प्रतिपक्षाच्या तंत्रावर व डावपेचांवर लक्ष ठेवून तो हाणून पाडण्याची तयारी, चांगल्या तन्हेचे दंडिकालालित्य या गोष्टी प्रत्येक खेळाडूच्या अंगी असणे जरूर आहे.

तेव्हा उत्तम खेळाडू होण्यासाठी काही विशेष गोष्टींची आवश्यकता असते. त्यांपैकी शक्ती, गती, निर्णयशक्ती, दम-शक्ती, शारीरिक चपळता, तत्परता, सावधानी, नियमांचे पालन, नेतृत्वशक्ती, प्रसन्न चेहरा व मनमिळाऊ स्वभाव या महत्त्वाच्या आहेत.

वरील गोष्टी कमी अधिक प्रमाणात आपल्या अंगी बाणण्याचा प्रत्येक खेळाडूने प्रयत्न केल्यास तो उत्तम खेळाडू बनू शकेल यात वाद नाही.

● ● ●

## प्रकरण ६

# प्रत्येक खेळाडूची जागा, कार्य आणि महत्त्व

**( Positional Game and Its Importance )**

आतापर्यंत आपण हॉकी खेळासंबंधी सर्वसाधारण माहिती पाहिली. प्रत्यक्षात खेळ खेळताना तो कसा खेळावा याबाद्दलही काही पद्धत, रीत किंवा शिस्त आहे. करमणुकी-साठी जरी खेळला तरी तो पद्धतशीरपणेच खेळला गेला तरच त्यात गोडी लागते व सुधारणाही होते.

म्हणूनच प्रत्येक बाजूला क्रिकेट, फुटबॉलप्रमाणेच एकूण ११ खेळाडू घेऊनच या खेळाला सुरुवात होते. आता ११ खेळाडूंच्या जागा काय आहेत, त्यांचे कार्य काय आणि त्याचे महत्त्व किती आहे हे समजणे अत्यंत जरुरीचे आहे.

क्रीडांगणाचे दोन भाग केलेले असतात हे आपण मागे पाहिले आहेच. एका अर्ध्या भागात एका संघाचे खेळाडू व दुसऱ्यात दुसऱ्या संघाचे. आता परंपरागत पद्धती-प्रमाणे या खेळाडूंची स्थाने काय ते आपण पाहू. ( आकृती ६·१ पाहा ).



आकृति ६·१ : खेळाडूंची स्थाने

आकृती पाहताना आपण गोलच्या बाजूने सुरुवात करू या. ‘ अ ’ हा गोल-रक्षक. ‘ ब ’ व ‘ क ’ हे डावे उजवे पूर्णरक्षक, ‘ ड ’ ‘ इ ’ ‘ फ ’ हे अनुक्रमे डावा, मधला व उजवा अर्धरक्षक. त्यानंतर आघाडीची फळी ते ‘ ग ’ ‘ ह ’ ‘ ज ’ ‘ ल ’ आणि ‘ म ’. यात ‘ ग ’ डावा बाहेरील, ‘ ह ’ डावा आतील, ‘ ज ’ केंद्रमध्य, ‘ ल ’ उजवा आतील आणि ‘ म ’ उजवा बाहेरील. अशीच रचना विरुद्ध बाजूच्या खेळाडूंची

असते. पण खेळ सुरू करताना आमोरासमोर उभे राहून खेळावे लागत असल्याने पूर्वेच्या खेळाडूंना त्यांचे प्रतिस्पर्धी पश्चिमेचे खेळाडूंशी मुकाबला करावयाचा असतो त्यामुळे पूर्वेची जी उजवी असेल ती पश्चिमेची डावी बाजू होईल हे समजणे अवघड नाही.

आतापर्यंत सर्व रूढ झालेल्या खेळाच्या पद्धतीप्रमाणे ही खेळाडूंची स्थाने दाखविलेली आहेत.

आपण आता या खेळाडूंच्या प्रत्येक स्थानाचा ( Position ) विचार करू.

## गोलरक्षक

गोलरक्षकाची जागा गोलाच्या दोन खांबांमध्ये असते. ही जागा अगर स्थान अगदी साधे व क्षुल्लक वाटते. पण खेळातली हार–जीत या स्थानावरच्या खेळाडूच्या कर्तत्वावर अवलंबून असते. आता या जागेवरील खेळाडू कितीही उत्तम, कुशल व कार्यक्षम असला तरी त्याच्या जोडीला दैवाची साथ असावी लागते, हे कोणालाही मान्य करावेच लागेल. गोलरक्षकाचे मुख्य काम व जबाबदारी म्हणजे गोल समोरील १६ यार्डाच्या अर्धवर्तुळातून मारलेला चेंडू गोलच्या दोन्ही खांबांमधील रेषेच्या पलीकडे जाऊ द्यावयाचा नाही. यासाठी त्याला अत्यंत जागरूक व चपळ हालचाल करावी लागते.

क्रीडांगणावर खेळ सुरू झाला म्हणजे गोलरक्षकाव्यतिरिक्त इतर सर्व खेळाडूंच्या हातून चूक झाली, चेंडू सुटला तर झालेली चूक सुधारण्यासाठी अगर चेंडूवर तावा मिळविण्यासाठी प्रयत्न करायला पुष्कळच वाव असतो. पण तशी संधी गोलरक्षकाला केव्हाच मिळू शकत नाही. त्याने कितीही प्रयत्न केले असले, आपले कसब पणाला लावले असले तरी गोलरेषेच्या आत चेंडू गेला की त्याच्या सर्व कर्तत्वावर पाणी पडते. केवळ जर पंचांनी, अशा वेळी चेंडूने गोलरेषा ओलांडली असली तरी, त्याला मान्यता दिली नाही तरच काय ती आशा असते. यावरून या जागेचे महत्त्व किती आहे याची कल्पना येईल !

गोलरक्षकाला त्याच्या या महत्त्वपूर्ण जागेत चेंडूशी मुकाबला करावयाचा असतो म्हणूनच काही जादा सुविधा व साधने त्याला दिलेली असतात. इतर खेळाडूंप्रमाणे त्याला हॉकिस्टिक वापरता येते. त्याचबरोबर त्याच्या पायाला गोलरक्षकाचे खास पायपट बांधता येतात, जाड व पुढील भाग टणक असलेला बूट वापरण्याची परवानगी असते. इतर कुणालाही नाही पण फक्त गोलरक्षकालाच गोल पुढील १६ यार्डांच्या अर्धवर्तुळात आलेला चेंडू पायाने आडविता येतो, ठोकर मारता येते, हातानेदेखील आडविता येतो, पण चेंडू झेलून फेकता येत नाही. पायांनी ठोकर मारता यावी म्हणून गोलरक्षकाला पायपटाला जोडलेले बुटावर बांधता येतील असे ठोकर आवरण वापरता येतात. त्याचप्रमाणे डोक्याला हॅटही घालता येते. तसेच हातात तो हातमोजेही घालू शकतो. गोलरक्षकाने ( गुप्तभाग सुरक्षा आवरण ) ॲबडॉमिनल पॅडशिवाय कधीही मैदानात उतरू नये.

या सर्व सुविधा व साधने पाहिल्यानंतर कुणालाही असे वाटेल की, गोलरक्षकाची

जागा आपली बरी ! पण नुसते वाटणे व प्रत्यक्ष त्या जागेवर खेळणे व तेथली जबाबदारी पेलायची झाली म्हणजे ' थो देता पर बडगा नहीं देता ' या म्हणीची प्रचिती येते. कारण या जागेवर थोडीदेखील चूक अगर ढिलाई करावयाला कसा तो वावच नसतो हे वर सांगितले आहेच.

गोलरक्षकाची जागा अत्यंत महत्त्वाची आहे म्हणूनच ती सुखाची व आरामाची नाही. पण ज्याला उत्साह व धकाधकीची आवड आहे अशांना ही जागा फार पसंत पडते.

गोलरक्षक हा बचावातील शेवटचा टप्पा असतो आणि म्हणून त्याच्यावर फार जबाबदारी असते. ज्याप्रमाणे किल्ल्याचा तट ढासळल्यावर बालेकिल्ल्यावरच सारी मदार असते त्याप्रमाणेच संघातल्या इतरांचे प्रयत्न निष्फळ ठरले की, सारी भिस्त गोलरक्षकावर येऊन पडते. म्हणून त्याच्या हातून थोडीशी जरी चूक अगर ढिलाई झाली, मग ती प्रत्यक्ष त्याच्या हातून अगर अप्रत्यक्ष रीतीने जरी झाली असली तरी त्याचा परिणाम संघालाच भोगावा लागतो.

संघामध्ये एखादा खेळाडू थोडासा जरी कमजोर अगर ढिला असला तर तो खपून जातो. पण गोलरक्षकाच्या बाबतीत ते शक्य नसते. गोलरक्षक म्हणून त्याला खेळावयाचे आहे त्याने गोलरक्षणासाठी स्वतंत्र व सतत सराव केला पाहिजे.

गोलरक्षकाला काही गुण उपजतच असावे लागतात. पण त्याचबरोबर अंदाज ( Judgement ) आणि धैर्य ( Courage ) या दोन गोष्टींची अत्यंत जरुरी असते. धैर्य व धडाडी नसलेल्या कोणत्याही खेळाडूला गोलरक्षक म्हणून खेळणे कधीही जमणार नाही. उत्तम व यशस्वी गोलरक्षक व्हायचे असल्यास पुढील गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत.

( १ ) चेंडू जेव्हा त्याच्याकडे येतो तेव्हा त्याने हुषार व जागरूक राहून कोण-त्याही पायाने चेंडूला ठोकर मारण्याच्या तयारीत असले पाहिजे. म्हणून दोन्ही पायांनी ठोकर मारण्याचा त्याने सराव केला पाहिजे. परंतु जरूर तेव्हाच ठोकर मारणे योग्य ठरते. जोराने मारलेल्या चेंडूवर ठोकर मारून स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेण्या-सारखे होईल याची त्याने जाणीव ठेवली पाहिजे.

( २ ) ज्या दिशेने चेंडू येतो त्या बाजूला राहून तो कसा अडवावयाचा याचा त्याला अंदाज घेता आला पाहिजे. चेंडू अडविताना तो दोन्ही पायांच्या टाचा जुळवून त्यांच्या झालेल्या ४५ अंशाच्या कोनातच तो अडविला पाहिजे. कोणताही चांगला गोलरक्षक कधीही आपल्या पायांमधून चेंडू जाऊ देणार नाही.

( ३ ) चेंडूची गती व प्रतिस्पर्ध्यांचा चेंडूवरील ताबा याचा बरोबर अंदाज घेऊन गोलरक्षकाला चेंडूवर धावून जाता आले पाहिजे. या धावून जाण्यामध्येच त्याचा अंदाज व कौशल्य ही स्पष्ट दिसून येतील. म्हणून पायपट सहज हालचाल करता येण्यासारखेच असावेत व ते बांधून त्याने पळण्याचा सराव केला पाहिजे.

( ४ ) पूर्ण व अर्धरक्षक आणि गोलरक्षक यांचे नेहमी संगनमत असले पाहिजे.

आणि त्या दृष्टीने त्यांनी आपापसांत समन्वय ( combination ) ठेवला पाहिजे. ज्या वेळी प्रतिस्पर्धी जोराने चेंडू घेऊन येतो व १६ यार्डांच्या रिंगणात गोलरक्षक एकटाच आहे अशा वेळी गोलरक्षकाने आपल्या जागेवर स्थिर उभे न राहता अंदाज घेऊन झटकन रिंगणाच्या टोकापर्यंत जाऊन प्रतिस्पर्ध्याला तोंड दिले पाहिजे. याच वेळी परिस्थितीचा अंदाज घेऊन अर्ध अगर पूर्ण रक्षकांपैकी कोणीतरी गोलरक्षकाची रिकामी पडलेली जागा भरून काढून गोलच्या बचावासाठी धावून गेले पाहिजे. या गोष्टी अनुभव व सरावानेच साध्य होतात. गोलरक्षकाने एकाच जागी चिकटून न राहता सतत जागरूक राहून हालचाल केली पाहिजे.

( ५ ) गोलरक्षकाच्या डाव्या बाजूने येणारे फटके अडविणे व परतविणे कठीण असते त्यासाठी त्याने नेहमी गोलच्यामध्ये न राहता थोडेसे डाव्याच बाजूला व तेही गोलरेषेच्या पुढे १½ फुटावरच उभे राहावे.

( ६ ) मारलेला चेंडू अडविताना तो पायपटावरून उसळी मारून पुढे जाऊ न देता जागच्या जागीच अडला पाहिजे. चेंडू अडविणे एवढेच गोलरक्षकाचे काम नसून चेंडू तावडतोब रिंगणाबाहेर कसा घालविता येईल याकडे त्याचे लक्ष असले पाहिजे. यासाठी पायपटाने चेंडू अडला व तावडतोब ठोकर मारणे शक्य असेल तर दांडिकेचा उपयोग करून चेंडू बाहेर काढणे हे शहाणपणाचे ठरेल.

( ७ ) ज्या वेळी दंडकोपरा मारला जातो त्या वेळी गोलच्या दोन्ही खांबांजवळ दोन पूर्णरक्षक व मध्ये गोलरक्षकांनी उभे राहावे आणि जेव्हा प्रतिस्पर्धी चेंडू गोलाकडे टोलविणार त्या क्षणी फक्त गोलरक्षकांनी आपली जागा सोडून चेंडूच्या दिशेने यार्ड दीड यार्ड पुढे यावे म्हणजे गोल होणे कठीण जाईल. यासाठी गोलरक्षक अत्यंत सावध व चपळ असला पाहिजे. दंडाचा फटका अडविण्याचा त्याने खूप सराव केला पाहिजे. तसेच उलटसुलट व सरळ फटके या गोष्टीदेखील त्याने चांगल्या आत्मसात केल्या पाहिजेत. नुसते चेंडू तटविणे व ढकलणे एवढेच त्याचे काम नाही. यासाठी त्याने अधूनमधून आघाडीवर देखील खेळण्याचा सराव ठेवला पाहिजे. उद्देश हा की, आघाडीवर खेळल्याने गोलरक्षकाच्या मनाची काय स्थिती असते हे त्या वेळी त्याला जास्त चांगल्या तऱ्हेने समजून येते.

तेव्हा गोलरक्षकासाठी मुख्य गोष्टी म्हणजे त्याला त्या जागेचा कठीण अभ्यास करण्याची तयारी पाहिजे. तसेच तीक्ष्ण दृष्टी व अंदाज घेण्याची क्षमताही अत्यंत जरूर आहे. तो निधड्या छातीचा व पूर्ण आत्मविश्वास असणारा चपळ खेळाडू असावा लागतो.

## आर. फ्रान्सिसचा अनुभव

भारताचा ऑलिंपिक हॉकीत गाजलेला गोलरक्षक आर. फ्रान्सिस याने आपल्या अनुभवावरून उत्तम व यशस्वी गोलरक्षक होण्यासाठी कोणत्या गोष्टी लक्षात ठेवाव्यात हे सांगताना पुढील गोष्टींचा प्रामुख्याने उल्लेख केला आहे.

( अ ) गोलरक्षकाने गोलच्या अर्धवर्तुळाबाहेर कधीही जाऊ नये. बचावाला दुसरा कोणीही नाही अशा वेळी स्वतःच्या अक्कलहुषारीने पुढे जावे, पण आक्रमण करणाऱ्याला कसे रोखता येईल यासाठी जागरूक राहून प्रयत्न केला पाहिजे.

( आ ) दंड कोपऱ्याच्या वेळी कावळ्यासारखी तीक्ष्ण व फिरती नजर ठेवली पाहिजे. तसेच चेंडू व आपण यांच्यात कोणीही येत नाही याचे त्याने भान ठेवले पाहिजे.

( इ ) जिथपर्यंत शक्य असेल तिथपर्यंत चेंडू मारण्यासाठी दंडिकेचाच उपयोग करावा. कारण लहान चुकीने देखील गोल होण्याचा धोका असतो.

( ई ) ठोकर अगर दंडिकेने चेंडू मारताना तो केव्हाही समोर न मारता बाजूला मारावा अगर आपल्या पूर्ण अगर अर्धरक्षकांकडे देण्याचा प्रयत्न करावा. परंतु कोणत्याही परिस्थितीत चेंडू जितक्या लवकर आपल्यापासून दूर जाईल इकडे लक्ष दिले पाहिजे.

( उ ) हाताचा वापर कमी करावा. छाती अगर तोंडावर चेंडू येत असेल तर तो जरूर हाताने अडवावा. पण तो पकडू नये. आपल्या हातात दंडिका आहे याचा विसर पडू देऊ नये.

( ऊ ) जमिनीसरपटत अगर अगदी खालून येणारा चेंडू पायाने अगर पायपटाने आडविला पाहिजे व त्वरित दूर केला पाहिजे.

( ए ) आडविल्याशिवाय चेंडू मारणे म्हणजे प्रतिपक्षाला गोल करण्याला संधी देणे होय.

( ऐ ) आपल्या पूर्णरक्षकांबरोबर त्याने नेहमी समन्वय अगर ताळमेळ ठेवला पाहिजे. आपल्याला चेंडूवर लक्ष केंद्रित करता येण्यासाठी आपल्या दृष्टीसमोर कोणी येत नाही ना हे पाहिले पाहिजे व इतर खेळाडूंनीही गोलरक्षकाला याबाबतीत संपूर्ण सहकार्य दिले पाहिजे.

( ओ ) नेहमी इकडेतिकडे सारखी हालचाल ठेवून चेंडू कसा व कुठून येईल यासाठी तत्पर व जागरूक राहिले पाहिजे. आपले लक्ष सदैव खेळाकडे व चेंडूवर केंद्रित केले पाहिजे.

( औ ) समजा, हातून चूक झाली अगर गोल झाला तरी त्याने हिंमत सोडता उपयोगी नाही. कारण आणखी गोल होऊ नये म्हणून जास्त तत्पर राहिले पाहिजे.

( अं ) स्वतःचे शरीर लवचिक व चपळ ठेवण्यासाठी त्याने रोज व्यायाम अवश्य केला पाहिजे व आहारावरही नियंत्रण ठेवणे अत्यंत जरुरीचे आहे.

यशस्वी व उत्तम गोलरक्षक होण्यासाठी मेहनत, निष्ठा व जिद्द या गोष्टी असल्या तर यश हे निश्चित आहे याचे प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे भारताचे एक उत्कृष्ट व तडफदार हॉकी गोलरक्षक श्री. शंकर लक्ष्मण हे आहे.

श्री. शंकर लक्ष्मण हे भारतीय सैन्यातील एक सैनिक. १९५२ पर्यंत त्यांनी दंडिका हातात धरली नव्हती. तत्पूर्वी ते फुटबाल खेळत! चेंडूची गती व दिशा याचा यामुळे अंदाज होता. त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनाने ते हॉकी खेळाकडे

खळले. मुलखातील छोट्या छोट्या संघांतून ते खेळत. पण त्यांना मोठ्या संघात शिरकाव मिळत नसे. या गोष्टीची श्री. शंकर लक्ष्मण यांना अत्यंत चीड आली. परंतु ते खचून गेले नाहीत हे विशेष. त्यांनी पुढे जिद्दीने व निष्ठेने जोरदार सराव सुरू केला. गोलरक्षक या जागेचा सर्व बाजूंनी अभ्यास केला व अवघ्या तीन वर्षांच्या कालावधीत म्हणजे १९५५ साली 'वार्सा' येथे झालेल्या जागतिक हॉकी स्पर्धेत त्यांची गोलरक्षक म्हणून निवड झाली.

## श्री. शंकर लक्ष्मण यांचा सल्ला

हे गोलरक्षकाचे स्थान प्राप्त करून घेण्यामागे काय आहे? या प्रश्नाबाबत श्री. शंकर लक्ष्मण म्हणतात, "सतत प्रॅक्टिस म्हणजे सराव करीत राहिल्यास कठीण काहीच नाही. तन मन लावून एखाद्या गोष्टीला वाहून घेण्याची तळमळ पाहिजे. खेळाला खेळ न समजता तो आपला धर्म आहे आणि त्यासाठी आपली इज्जत पणाला लावण्याची मनाची तयारी पाहिजे. अंगमेहनत पाहिजे. स्वतःचे कातडे बचावून चालणार नाही. एकदा गोलरक्षक ही जागा मुक्रर केल्यानंतर सर्व कौशल्य पणाला लावून मेहनत केली पाहिजे.

श्री. शंकर लक्ष्मण यांच्या मते उत्तम गोलरक्षकाला तीक्ष्ण नजर, धीटपणा, वेडरवृत्ती, चपळाई, चेंडू जोराने मारण्याची सवय, चेंडू अडविण्याचे कसब, सशक्त व मजबूत शरीरयष्टी यांची अत्यंत जरूर आहे. खुजा व अती उंच खेळाडू गोलरक्षक म्हणून यशस्वी होऊ शकत नाही. तसेच गोलरक्षकाला सर्व तऱ्हेच्या हवामानात खेळावयाची सवय पाहिजे. प्रत्येक ठिकाणच्या हवामानाप्रमाणे गरम अगर पातळ कपडे त्याने वापरले पाहिजेत.

## सरावाचा अनुभव

सरावाबाबत व मेहनतीबाबत त्यांचे अनुभव व कष्ट लक्षात घेण्यासारखे आहेत. "गोलरक्षकाच्या जागेची मी निवड केल्यावर मनाचा निर्धार करून सारा दिवस पायपट बांधून तयारी करून मी गोलात उभा राहात असे व जो येईल त्याला सांगत असे की, 'तुम्ही गोलात चेंडू मारा, मी तो रोखीन!' मी मन लावून सराव करीत होतो. माझ्या अधिकाऱ्यांचे माझ्यावर लक्ष असे. गोलरक्षण करताना एक चेंडू जरी हातून सुटला तरी त्यासाठी शिक्षा म्हणून दंडिकेचा एकेक तडाखा माझ्या डोक्यावर मारला जाई."

"त्याचप्रमाणे पुढे पुढे तर गोलसमोरील अर्धवर्तुळावर स्वतः अधिकारी उभे राहात व अर्धवर्तुळावर थोड्या थोड्या अंतराने चेंडू ठेवून तेथे उभ्या असलेल्या खेळाडूंना एकापाठोपाठ एक असे सारखे चेंडू गोलात मारण्यास सांगत. गोलात मी एकटा आणि 'हिटमारो' असा हुकूम होताच दुसऱ्या बाजूने सटासट असे ५० तरी

चेंडू मारले जात आणि ते सारे चेंडू मोठ्या चपळाईने आडविण्याची माझ्यावर कामगिरी. त्यातले काही हातांनी, तर काही पायांनी, काही उडी मारून, तर काही जमिनीवर सुरुंग मारून मी रोखीत असे. इतकी धडपड करूनही काही चेंडू असे येत की, ते रोखणे मानवी शक्तीच्या पलीकडेच असे! त्यामुळे काही चेंडू आडविले जात नसत म्हणून त्याचा दंड अगर शिक्षा मला भोगावी लागे. त्याला पर्याय नव्हता. शिस्तपालन हे कर्तव्य होते! तर ही शिक्षा काय होती? एक गोल झाला तर त्याबद्दल १० बैठका माराव्या लागत. म्हणजे जर ५० चेंडूंपैकी १० गोल जरी झाले तरी त्याची शिक्षा म्हणून १०० बैठकांची शिक्षा तावडतोब अमलात आणली जाई. अशा तऱ्हेने शिक्षा व असे कष्ट करावेच लागतात. म्हणून थोड्या यशाने हुरळून जाणारे आजकालचे फॅशनेबल खेळाडू, आणि खेळासाठी पूर्ण वाहून घेऊन, पडेल ती अंगमेहनत करून, येतील ते कष्ट सहन करण्यास तयार असणारा खेळाडू, यांत हाच फरक आहे. म्हणूनच अलीकडे 'यश' आपल्यापासून दूर जात आहे."

## कटाक्षाने टाळावयाच्या गोष्टी

उत्तम व यशस्वी गोलरक्षक होण्यासाठी काय काय गोष्टी करावयाला हव्या आणि कशाकशाची जरुरी आहे हे सविस्तरपणे वर पाहिले. आता, त्याचबरोबर ज्या गोष्टी गोलरक्षकाने कटाक्षाने टाळल्या पाहिजेत त्याबाबतही थोडक्यात सांगितले पाहिजे.

(१) मैदानावर उतरून गोलरक्षकांनी आपली जागा घेतली की गोलाजवळपास असलेले मित्र अगर इतर प्रेक्षक यांच्याबरोबर बोलणे अगर गप्पा मारणे बंद केले पाहिजे.

(२) बाहेरच्या लोकांकडून काहीही सूचना, टिंगल अगर वाहवा झाली तरी तिकडे पूर्ण दुर्लक्ष केले पाहिजे. सदैव चेंडूवर लक्ष केंद्रित केले पाहिजे.

(३) कोणत्याही चेंडूकडे दुर्लक्ष अगर कमी महत्वाच्या दृष्टीने पाहू नये. सोपा वाटणारा चेंडूच पुष्कळदा धोका देतो.

(४) खात्री असल्याशिवाय ठोकर मारणे धोक्याचे असते. तेव्हा प्रथम चेंडू आडवून मगच ठोकर मारणे हेच श्रेयस्कर ठरते.

(५) जोराचा फटका येतो म्हणून डोळे मिटून घेऊ नयेत. तसेच पाठ अगर बगल पुढे करून उभे राहणे टाळले पाहिजे. त्यामुळे फायदा तर होत नाही तर उलट धोका जास्त असतो.

(६) हवेतील चेंडू आडविण्यासाठी केव्हाही दंडिका खांद्याच्या वर जाऊ देऊ नये.

(७) हाताने चेंडू टाकणे, ढकलणे या गोष्टी नियमबाह्य आहेत म्हणून त्या करू नयेत.

(८) हातात दंडिका असल्याशिवाय चेंडू घेण्यासाठी अगर चेंडूवर ताबा मिळ - विण्यासाठी जाऊ नये.

(९) चेंडू आडविताना चेंडूवर बसू नये.

(१०) चेंडूवर ताबा मिळणे शक्य नाही म्हणून निष्कारण आडथळा आणू नये अगर दंगामस्ती करू नये.

(११) खेळ हा खेळ आहे, तेथे मारामारी करणे अगर सूड बुद्धीने प्रतिस्पर्ध्याशी वर्तन ठेवणे वगैरे गोष्टी करू नयेत.

(१२) जो चेंडू कोणताही धोका नसताना मैदानाबाहेर जात आहे तो आडविण्याचा उगाच प्रयत्न करू नये.

(१३) आपल्याकडे आलेला चेंडू झटकन दूर मारावा पण तो केव्हाही मैदानाच्या मध्ये मारू नये.

(१४) गोल समोरील अर्धवर्तुळाच्या रेषेबाहेर पायपट किंवा बुटाचा चेंडू आडविण्यासाठी अगर मारण्यासाठी उपयोग करू नये.

(१५) गोलात एकाच जागी खिळून उभे राहू नये, हालचाल करावी.

(१६) जेव्हा अत्यंत जरुरी आहे तेव्हाच आपली जागा सोडावी.

(१७) प्रतिस्पर्ध्यासंबंधी मनात केव्हाही भीती बाळगू नये अगर त्याला तुच्छ लेखू नये.

(१८) स्वतःचे मनोधैर्य केव्हाही खचू देऊ नये.

(१९) स्वतःबद्दल अगर संघाबद्दल फाजील विश्वास बाळगून बेसावध राहू नये.

(२०) प्रयत्न हे केलेच पाहिजेत. नुसते नशिबावर हवाला ठेवून राहू नये.

गोलरक्षकाचे तंत्र व शास्त्र, तसेच त्याला आवश्यक असणाऱ्या गोष्टी कोणत्या व त्याने कशापासून सावध राहावे, काय काय गोष्टी टाळाव्यात याचा सविस्तर व सांगोपांग विचार, हे वर जरी सांगितले असले तरी प्रत्यक्ष खेळताना सर्वच गोष्टी काटेकोरपणे पाळणे अगर टाळणे हे शक्य होत नाही म्हणून अनुभवाने व सरावानेच पुष्कळ गोष्टी समजून येतात हे लक्षात ठेवावे.

## पूर्णरक्षक

गोलरक्षकापुढील बचावाची मुख्य व महत्त्वाची फळी म्हणजे ' पूर्णरक्षक '. या फळीवर संघाच्या बचावाची खरी मदार असते. प्रतिपक्षाच्या आघाडीच्या खेळाडूंना थोपविणे, त्यांच्या ताब्यातील चेंडूवर ताबा मिळविणे व त्यांनी चेंडू गोलमध्ये नेण्यासाठी योजलेले डावपेच हाणून पाडणे याची बव्हंशी जबाबदारी पूर्णरक्षकांवर असते. याचबरोबर चेंडूवर ताबा मिळविला की, लगेच चेंडू आपल्या खेळाडूंना योग्य ठिकाणी पोहोचविणे अशी दुहेरी महत्त्वाची कामगिरी त्यांच्यावर असते.

पूर्णरक्षक हे मानवी शरीरातील पायाप्रमाणेच हॉकी खेळाचे मुख्य आधारस्तंभ आहेत. पाय जर मजबूत असतील तर मनुष्याला जशी मोठी जबाबदारी व कष्ट पार पाडता येतात, तद्वतच पूर्णरक्षक जर मजबूत व भरवशाचे असतील तर संघाची बळकटी

जास्त वाढते. पायाप्रमाणेच पूर्णरक्षकही डावा व उजवा, असेच ओळखले जातात. आपल्या गोलाच्या पुढील डावी व उजवी बाजू अनुक्रमे डाव्या व उजव्या पूर्णरक्षकांनी संभाळायची अशी सर्वसाधारण कल्पना असते. परंतु हा खेळ सांघिक भावनेचा असल्याने डाव्याने डावीच व उजव्याने उजवीच बाजू सांभाळणे असा काही दंडक घातलेला नसतो. खेळात गोंधळ व गर्दी होऊ नये, तसेच आपली जागा काय आहे याची जाणीव राहावी म्हणून डावा व उजवा पूर्णरक्षक असे भेद केलेले आहेत.

पूर्णरक्षक हा चढाई करणारे प्रतिस्पर्धी व आपला गोलरक्षक यांच्यामध्ये उभा असलेला बुरुज असतो. म्हणून त्याच्यावर फार मोठी जबाबदारी असते. हा बुरुज जर ढासळला तर पराभवापासून वाचणे फार कठीण काम होऊन बसते.

यासाठी उंचापुरा, दणकट शरीराचा, बेडर व निधड्या छातीचा खेळाडू या जागेसाठी अत्यंत उपयुक्त ठरतो. बहिरीससाण्यासारखी त्याची नजर तीक्ष्ण पाहिजे व शांत डोके ठेवून आपले काम चोख बजावेल असा भरवशाचा हा खेळाडू असावा लागतो. शरीर मजबूत व दणकट असूनही त्याच्या हालचालीत चपळता असली पाहिजे. भरपूर पळण्याची त्याला सवय पाहिजे.

प्रतिपक्षाच्या खेळाडूशी जाऊन भिडताना त्याने बिलकूल घाबरता उपयोगी नाही. पूर्णरक्षकांनी शक्यतो चेंडू बगलेच्या खेळाडूकडे देण्याचा अगर नेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अलीकडे असे स्पष्ट दिसून येते की, जोपर्यंत प्रतिस्पर्धी आपल्यावर हल्ला करावयाला येत नाही तोपर्यंत चेंडू आपल्याकडून दुसरीकडे द्यावयाचा नाही. पण हे असे करणे म्हणजे संघाच्या दृष्टीने घातक आहे. पूर्णरक्षकांनी आपल्या खेळाडूला शक्य तितक्या जलद चेंडूचा पुरवठा केला पाहिजे. त्याची जागा अतिशय जबाबदारीची असते हे त्याने लक्षात ठेवले पाहिजे. त्याला चेंडू द्यायला उशीर झाला की, प्रतिस्पर्ध्यांना आपापल्या जागांवर स्थिर होण्याला वाव मिळतो. चेंडू कुणीकडे जाईल याचा अंदाज करता येतो. तसेच पूर्णरक्षकांवर हल्ला झाला आणि त्याच्या ताब्यातला चेंडू गेला की गोलला धोका निर्माण झालाच! म्हणून तशी संधी शत्रुपक्षाला शक्य तो आपल्या दिरंगाईमुळे मिळणार नाही याची काळजी घेतली पाहिजे.

उत्तम व यशस्वी पूर्णरक्षक होण्यासाठी ज्याप्रमाणे दणकट शरीरयष्टी व चपळता पाहिजे त्याचप्रमाणे त्याला पुढील गोष्टींचा सराव हा पाहिजेच.

( १ ) चेंडू व्यवस्थित व अचूक थांबविता आला पाहिजे. चेंडू अडविला की लगेच तो हमखास आपल्याच खेळाडूकडे देता आला पाहिजे. त्यासाठी फटके व उचल फटके मारण्यात तो तरबेज पाहिजे. चेंडू कोणत्याही बाजूने का येईना – सरळ अगर उलट्या बाजूने – तो तितक्याच चपळाईने अडविता येणे हे महत्त्वाचे आहे. यासाठी चेंडूवरच दृष्टी केंद्रित करणे अत्यंत महत्त्वाचे आहे.

( २ ) जोरदार फटका मारता आला म्हणजे तो उत्तम पूर्णरक्षक होतोच असे नाही. त्याने मारलेला फटका स्वतःच्याच संघातील खेळाडूकडेच जाईल याचा त्याला

अंदाज पाहिजे. उगाच अंदाजाने फटका मारून चालणार नाही. त्याने प्रतिस्पर्ध्यांच्या अर्धरक्षकांवर नियंत्रण ठेवता ठेवता आपला खेळ आपल्या अर्धरक्षकांना पूरक होईल असाही ठेवला पाहिजे.

( ३ ) दोन्ही पूर्णरक्षक एकाच रेषेत उभे न राहता पुढेमागे असे राहिल्यास त्याचा उपयोग होतो.

( ४ ) प्रतिस्पर्ध्यांचे डाव उधळून आणि चेंडूवर ताबा मिळवून तो आपल्या खेळाडूंना योग्य ठिकाणी पोहोचविणे अशी दुहेरी कामगिरी पूर्णरक्षकांना करावी लागते. यासाठी तीक्ष्ण दृष्टी, चपळ हालचाल आणि झटपट निर्णय या गोष्टींची अत्यंत जरूरी असते.

( ५ ) पूर्णरक्षकाची जागा अत्यंत महत्त्वाची, उत्साहाची आणि मोठ्या आधाराची असते. प्रतिस्पर्ध्यांना चेंडू मिळून देणे, अगर त्यांच्या चकविण्यामध्ये ( पासेसमध्ये ) अडथळा आणून त्यांच्याकडून चेंडू घेऊन त्यावर ताबा ठेवणे हा पूर्णरक्षकाचा खरा उद्देश असतो.

( ६ ) गोलरक्षक व प्रतिस्पर्ध्यांच्या आघाडीचे खेळाडू यांच्यामध्ये जागरूकतेने राहून, प्रतिस्पर्ध्यांना गोलापासून जितके दूर ठेवता येईल ते पाहणे ही पूर्णरक्षकाची खरी ड्यूटी आहे.

( ७ ) प्रतिस्पर्ध्यांकडून कोणत्याही तऱ्हेने चेंडूवर ताबा मिळविणे एवढाच विघातक खेळ पूर्णरक्षकांना खेळावयाचा नसून त्यांचे मुख्य काम म्हणजे चढाई थोपवून धरून आपल्या खेळाडूंना विधायक मदत करणे हे आहे.

( ८ ) ज्या परिस्थितीत प्रतिस्पर्ध्यांचे आघाडीचे खेळाडू खेळत असतात त्या दृष्टीने विचार करून एका बाजूकडून दुसरीकडे छेदत जाईल अशा तऱ्हेने चेंडू सतत टोलवत राहणे ( cross passes ) हे पुष्कळदा हिताचे ठरते. परंतु एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही की, कोणत्याही वेळी आपल्या गोलजवळ अशा तऱ्हेची टोलवाटोलवी करण्याचा मोह टाळला पाहिजे.

( ९ ) पूर्णरक्षक हे सहजासहजी प्रतिपक्षाकडून चकविले जातील असे असून चालणार नाहीत. जर प्रतिस्पर्धी चकवून पुढे गेला तर लगेच त्याचा पाठलाग करून त्याच्याकडील चेंडू आपल्या ताब्यात कसा मिळविता येईल यासाठी त्यांनी प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे. मागे पळताना दंडिका डाव्या हातात घेऊन त्वरेने धावले पाहिजे. त्याचप्रमाणे बगलेच्या खेळाडूंकडे जास्त लक्ष ठेवून ते चेंडू कसा पुढे ढकलतात व त्यांची हालचाल कशी चालते याकडे जागरूकतेने लक्ष देऊन खेळले पाहिजे. आपली जागा व ठिकाणी यात शक्यतो ढिलाई होऊ देता उपयोगी नाही. गोलपुढील अर्धवर्तुळाच्या शक्यतो दूर चेंडू कसा राहील या दृष्टीने पूर्णरक्षकांनी आपल्या खेळात कौशल्य दाखविले पाहिजे.

## श्री. पृथ्वीपालसिंगाचे मत

भारताचा सुप्रसिद्ध हॉकीपटू पृथ्वीपालसिंग हा जगातील एक उत्कृष्ट पूर्णरक्षक म्हणून समजला गेला होता. तो म्हणतो, " मी जगातील हॉकी खेळणाऱ्या साऱ्या देशांतील संघांबरोबर खेळलो आहे. मला असे स्पष्ट दिसून आले की, आघाडी, अर्धरक्षक किंवा गोलरक्षक यांचे आक्रमण, चढाई अगर बचावाचे धोरण वेगवेगळे असते, पण पूर्णरक्षकांच्या खेळाकडे पाहिले तर त्यांचे मुख्य कार्य, जबाबदारी व युक्त्या-प्रयुक्त्या यांत फारसा फरक दिसून येत नाही. आजकाल कोपरा अगर दंड कोपऱ्याचे गोल जोरदार फटक्यांमुळेच होतात व ते बहुधा पूर्णरक्षकच करतो. पण फटका मारताना त्यात कौशल्य पाहिजे. उगाच ताकदीने फटका मारून चालणार नाही. पूर्णरक्षकाने शक्यतो चेंडू बगलेच्या खेळाडूकडे देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पण अलीकडे चेंडू सहजासहजी आपल्या खेळाडूकडे मारता येत नाही असे दिसले की बरेच पूर्णरक्षक ' रेबु 'ची युक्ती अमलात आणतात. म्हणजे चेंडू दंडिकेने झटकन हवेत असा उडवावयाचा की, तो साधारणपणे आपल्या आघाडीच्या खेळाडूंपाशीच जाऊन पडावा. पण याला सरावाची व शांत डोक्याची अत्यंत जरुरी आहे. पूर्णरक्षकांनी आपल्या जागा अगदी जरूर असल्याशिवाय सोडू नये. डाव्याने डावीकडील व उजव्याने उजवीकडील जबाबदारी संभाळली पाहिजे. विशेषतः अर्धवर्तुळाच्या जवळपास अगर आत चेंडू असताना नेहमी गोंधळ उडतो व गर्दी होते, तेव्हा हे विशेष लक्षात ठेवले पाहिजे. त्याचबरोबर गोलरक्षकाच्या दृष्टीसमोर येऊन त्याचा धोका जास्त वाढवू नये. "

इंग्लंडचा १९५२ च्या हॉकी संघाचा नायक डेनिस कर्निकल म्हणतो, " पूर्णरक्षकाचा खेळ म्हणजे चेंडूभोवती सारखे घुटमळत राहणे आणि हे त्याचे खरे कौशल्य आहे. या जागेवरचा खेळाडू पायाच्या बोटावर नेहमी तयार असला पाहिजे. त्याची दृष्टी सतत चेंडूवर खिळून राहिली पाहिजे. "

या साऱ्या गोष्टी व तंत्र लक्षात ठेवून जर पद्धतशीरपणे नियमित सराव केला, आणि आपली जबाबदारी व आपल्या जागेचे किती महत्त्व आहे हे मनात ठेवून जर खेळ खेळला तर तो एक उत्तम व यशस्वी पूर्णरक्षक खेळाडू होईल यात वाद नाही. जाता जाता हेही नमूद केले पाहिजे की, मैदानावर तो वैयक्तिक जबाबदारीवर खेळत नसून तो एक संघाचा घटक आहे, म्हणून त्याने संघातील गोलरक्षकापासून आघाडीच्या खेळाडूंपर्यंत सर्वांशी सहकार्याने व समजूतदारपणे खेळले पाहिजे. आपले डोके न वापरता जर पूर्णरक्षक खेळू लागला तर संघाला तो मोठा अडथळा व धोका निर्माण होतो, हे त्याने लक्षात ठेवावे. केव्हाही मनोधैर्य ढळू देता उपयोगी नाही. चपळाई व युक्त्या-प्रयुक्त्या या गोष्टी मुख्यत्वे करून पूर्णरक्षकांनी अमलात आणल्या पाहिजेत.

## अर्धरक्षक

' खेळाचा कणा ' असं ज्याचं वर्णन करतात तो म्हणजे अर्धरक्षक. हे तीन असतात.

एक डावा, मधला व तिसरा उजवा. मधला म्हणजे मधला अर्धरक्षक (Centre Half). हा जणू शरीरातील मणक्यासारखाच महत्त्वाचा आहे. इतर जागांवर थोडेसे उसासे टाकण्यासाठी किंवा शिथिल होण्यासाठी म्हणून काही वेळ अगर क्षण म्हणा, मिळू शकतात. पण अर्धरक्षकांच्या जागी शिथिलपणा अगर सुस्ती येणे म्हणजे पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे आहे.

अर्धरक्षकाच्या जागेला उत्तम दृष्टी, बळकट मनगट, पायांना गती असणारा, अंगात भरपूर रग असणारा, दमछाक टिकविणारा असाच खेळाडू योग्य ठरतो. तसेच शारीरिक दृष्ट्या पूर्ण दुरुस्त असणे हेही महत्त्वाचे आहे. दुसऱ्या कोणत्याही खेळाडूला मैदानावर चौफेर पळावे लागत असेल त्यापेक्षा ज्यास्त धावाधावी अर्धरक्षकाला करावी लागते आणि विशेषतः मध्य अर्धरक्षकाला सर्वांत जास्त पुढे-मागे असे सारखे धावावे लागत असल्याने त्याच्या अंगी भरपूर जोम, उत्साह आणि चपळता असणे अत्यावश्यक आहे.

●

## चढाई

चढाईच्या वेळी आघाडीच्या खेळाडूंना मदत करणे आणि संरक्षणाच्या वेळी पूर्णरक्षकाच्या मदतीला त्याला नेहमी सज्ज असावे लागते, आणि यासाठीच त्यांना पुढे मागे सारखे धावावे लागते.

अर्धरक्षकाने आपल्या आघाडीचे खेळाडू कोणती पद्धत खेळण्यासाठी अमलात आणतात इकडे जागरूकतेने लक्ष ठेवले पाहिजे. आघाडीचा खेळाडू चेंडू पुढे काढण्यासाठी काय डावपेच लढवितो याचा अर्धरक्षकांना अंदाज असावा लागतो. कारण त्यामुळे त्यांना तशी हालचाल करावी लागते. त्यांच्या हालचालीमुळे प्रतिस्पर्ध्यांच्या ताब्यातील चेंडू मिळविणे सोपे जाते.

सगळ्यात महत्त्वाची जागा मध्य अर्धरक्षकाची. प्रतिस्पर्ध्यांचा केंद्रमध्य खेळाडू हा कशा तऱ्हेने हल्ला करील याकडे मध्य अर्धरक्षकाने सतत लक्ष ठेवले पाहिजे. नुसत्याच केंद्रमध्य खेळाडूकडे लक्ष ठेवून त्याला चालणार नाही, तर दोन्ही डाव्या व उजव्या बगलेच्या प्रतिस्पर्ध्यांच्या खेळाडूंच्या हालचालीकडे देखील दुर्लक्ष करून चालणार नाही. म्हणूनच मध्य अर्धरक्षक हा संघाचा कणा असतो. यासाठी त्याला ' वॉचडॉग ' म्हणजे पहाऱ्यावरील कुत्र्याची भूमिका करावी लागते. त्याचा आवाका मोठा असावा लागतो, कारण त्याची जबाबदारीही मोठी असते. त्यासाठी त्याच्या अंगात भरपूर हिंमत, उत्साह व ताकद असावी लागते.

आपल्या आघाडीच्या खेळाडूंना वेळेवर चेंडू काढून देणे, चढाईच्या वेळी आघाडीच्या खेळाडूंचा अगदी प्रतिस्पर्ध्यांच्या गोलार्धापर्यंत पाठपुरावा करणे, तसेच आपल्या दोन्ही बाजूंना होणाऱ्या चेंडूच्या हालचालीवर कटाक्षाने लक्ष ठेवणे इतकी जबाबदारी त्याला पेलावी लागते. वेळप्रसंगी चपळाई करून गोल मारण्याची आलेली संधीही

साधली पाहिजे. जसा तो आघाडीबरोबर चपळाईने पुढे जातो त्याचप्रमाणे विरुद्ध बाजूच्या खेळाडूंनी चेंडू अडवून तो जोरात परतविला की लगेच चेंडूच्या पाठोपाठ धावून चेंडू व प्रतिस्पर्ध्यांच्या खेळाडूला कसे रोखता येईल यासाठी त्याला निरनिराळे डावपेच लढवावे लागतात.

आपला पाय व हॉकी या दोन्हींचा उपयोग करून प्रतिपक्षाच्या खेळाडूने चकविण्यासाठी व चेंडू उलटसुलट नेण्यासाठी योजलेली क्रिया यांच्यात आडवला आण-ण्यात यश मिळविणे अत्यंत महत्त्वाचे असते.

उत्तम अर्धरक्षकाच्या अंगी चतुराई व चपळपणा हे गुण अवश्य असावे लागतात. डाव्या व उजव्या अर्धरक्षकाचा खेळ व जागा यांना बऱ्याच मर्यादा आहेत, पण तशी स्थिती मध्य अर्धरक्षकाच्या बाबतीत असू शकत नाही. तो चाकाच्या आसा-प्रमाणे असतो. आस भक्कम तर चाक भक्कम! तद्वतच मध्य अर्धरक्षक मजबूत व भरवशाचा तर संघाची बळकटी उत्तम असेच समजले जाते. त्याला भरपूर ताकद ( Stamina ) असावी लागते. त्याने चेंडू त्याच्याजवळ येण्यापूर्वीच त्याचा ताबा घेण्यासाठी धावले पाहिजे. चाणाक्षपणे प्रतिपक्षाच्या अर्धरक्षकांचा अंदाज घेऊन त्या धोरणाने आपली चढाई करणे हे जास्त महत्त्वाचे आहे. मैदानाच्या मध्यापेक्षा फार पुढे त्याने जाता उपयोगी नाही. कारण त्याचे मुख्य कर्तव्य म्हणजे प्रतिपक्षाच्या खेळाडूला अडविणे अगर आडवला आणणे हे आहे आणि तो जर जास्त दूर गेला तर त्याला परत येणे फार मुष्किलीचे होऊन जाते. आपल्या बाजूला चेंडू येत असला की त्याने प्रतिस्पर्ध्यांच्या आघाडीचे खेळाडू आणि आपले गोलार्धवर्तुळ यांच्या मध्येच जागरूकतेने राहणे इष्ट असते.

अर्धरक्षकाने दणादण फटके मारणे टाळले पाहिजे. ' शेव्ह पास ' म्हणजे चेंडू सहज लोटणे ही हमखास चेंडू आपल्या खेळाडूला देण्याची उत्तम कृती आहे. परंतु त्याचबरोबर अर्धरक्षकाने आपल्या आघाडीच्या खेळाडूला लोटलेला चेंडू पळता पळता सहज ताब्यात घेता येईल याची जाणीव ठेवून चेंडू किती जोराने टोलवायचा अगर लोटायचा हा अंदाज घेतला पाहिजे. काही वेळा प्रतिस्पर्ध्यांची फळी फोडून चेंडू काढता येत नसेल तर आपलेच जोडीदार जे दोन अर्धरक्षक आहेत त्यांच्याकडेच चेंडू टोलविला तर तितका अवधी मिळतो व संधी मिळते. पण या गोष्टी अनुभवाने साध्य होतात.

अर्धरक्षकाने, विशेषतः डाव्या व उजव्याने आपली जागा सोडून इतरत्र जाऊ नये. ' माणसास माणूस ' ( Man to Man ) या पद्धतीप्रमाणे प्रतिपक्षाच्या खेळाडूंना धरून ठेवले पाहिजे. डाव्या अर्धरक्षकाने आपल्या डाव्या पूर्णरक्षकापासून मध्यरेषेच्या थोडे पुढे इथपर्यंत, मैदानाच्या डाव्या अंगाची आपली क्षेत्रमर्यादा आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. तीच स्थिती उजव्या बाजूच्या अर्धरक्षकाची होईल. एखादा खेळाडू आपले क्षेत्र सोडून जर दुसरीकडे जाऊन खेळू लागला तर त्यामुळे गोंधळ निर्माण

होईल. 'मरगनास माणूस' ही रचना ढिली होईल आणि प्रतिपक्षाचा एक खेळाडू आक्रमण करावयाला मोकळा होईल. यासाठी प्रत्येकाने आपली जागा सोडू नये. आपल्याच जागेत खेळायचे महत्त्व किती आहे हे लक्षात घ्यावे.

बचाव

चढाई व बचाव असे नेहमी प्रसंग येतात व त्या दृष्टीने खेळ खेळावा लागतो. बचावाच्या वेळी जेव्हा बगलेकडून चेंडू येतो त्या वेळी आपल्यासमोर चेंडू येणार याची अर्धरक्षकाला ( डाव्या अगर उजव्या ) जाणीव असली पाहिजे आणि त्यासाठी चेंडूवर ताबा मिळविण्यासाठी त्याने तत्पर राहून तो मिळविला पाहिजे. पण त्याचबरोबर आपली संरक्षणाची जबाबदारी ओळखून त्याने जास्त पुढे जाणे धोक्याचे ठरेल. यासाठी डावीकडून अगर उजवीकडून केव्हा व कसा चेंडू येईल याचा अंदाज सरावानेच लक्षात येईल.

बगलेकडूनच चेंडू येईल असे नाही तर तो केंद्रमध्याकडून बगलेकडे देखील जाईल. अशा वेळी तो तसा जाऊ न देण्यासाठी मध्येच घुसून चेंडू ताब्यात घेण्याची कोशीस केली पाहिजे. आपल्या अर्ध्या भागात जेव्हा चेंडू आहे त्या वेळी तो जितक्या लवकर दुसऱ्याला देणे शक्य आहे तेवढे केले पाहिजे. स्वतःजवळ चेंडू ठेवणे नेहमी धोक्याचे व हानिकारक असते ! हे ब्रीदवाक्य विसरता उपयोगी नाही.

जेव्हा आपले चढाईचे धोरण असेल तेव्हा मैदानावर उजव्या अर्धरक्षकाची जागा जास्त सोपी आणि त्या मानाने डाव्या अर्धरक्षकाची कठीण समजली जाते. त्याचे कारण म्हणजे उजवा अर्धरक्षक चेंडू सहजासहजी उजव्या हाताने विनासायास अडवू अगर तोलू शकतो पण ती स्थिती डाव्या अर्धरक्षकाची नसते. त्याला नेहमी उलट्या बाजूने चेंडू आडविणे अगर चकविणे भाग पडते.

चढाईच्या वेळी दोन्ही अर्धरक्षकांनी थोड्या तिरक्या रेषेत आपली चाल ठेवली पाहिजे आणि मध्येच जेव्हा मोकळी जागा दिसेल त्या वेळी ताबडतोब चेंडू मारला पाहिजे. उद्देश हा की, प्रतिस्पर्ध्यांना चेंडूवर ताबा मिळविणे कठीण जावे.

कुठल्याही संघाचा विजय मुख्यत्वे करून त्यांची अर्धरक्षक फळी किती जोरकस व परिणामकारक आहे यावर अवलंबून असतो. वेळेवर चेंडू चकविणे, विजेच्या चपळाईने हालचाल करणे आणि न चुकता चेंडूवर बरोबर ताबा मिळवून आपल्या दंडिका-कौशल्याने प्रतिपक्षाला नामोहरम करणे ही उत्तम अर्धरक्षकाची लक्षणे आहेत. तसेच आपली जागा कोणती, तिची मर्यादा किती व तिचे महत्त्व काय आहे हे त्याला पक्के माहीत असले पाहिजे.

डाव्या अर्धरक्षकाची जागा त्यातल्या त्यात अवघड समजली जाते. त्याचे कारण अगदी उघड आहे. खेळाडूला चेंडू नेहमी शरीराच्या डाव्या बाजूकडून घ्यावा लागतो आणि ती बाजू स्वाभाविकपणे कठीणच असते. म्हणून मजबूत डावे मनगट, हालचालीत

चापल्य, उत्तम पदलालित्य या गोष्टी ज्या खेळाडूत आहेत त्याला डाव्या अर्धरक्षकाच्या जागेवर खेळणे अवघड जात नाही.

चढाई असो वा बचावाचा खेळ असो डाव्या व उजव्या अर्धरक्षकांनी ज्या गोलच्या खांबाजवळ तो असेल त्या खांबात आणि २५ यार्डांची रेषा यांमध्ये आपली तटबंदी निर्माण केली पाहिजे आणि या धोरणाने जर खेळ खेळला गेला तर चेंडूसाठी जास्त धावाधाव न करता त्याला आपोआप चेंडू मिळू शकतो. त्याने सतत बगलेच्या खेळाडू आणि बगलेच्या आतला खेळाडू ( Inner and outer player ) यांच्या मध्ये नेहमी राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कोणत्याही ठिकाणी मोकळी जागा पडत नाही ना याकडे अर्धरक्षकाचे विशेषतः मध्य अर्धरक्षकाचे नेहमी लक्ष पाहिजे आणि त्या ठिकाणी त्याने धाव घेतली पाहिजे.

## अमीरकुमारचा अभिप्राय

भारताचा एकेकाळी गाजलेला अर्धरक्षक अमीरकुमार, याचे म्हणणे असे की, " संघाचे यश- अपयश पुष्कळ अंशी अर्धरक्षकांवर अवलंबून असते. आघाडीचे खेळाडू अगर पूर्णरक्षक हे कितीही ताकदीचे व उत्कृष्ट दर्जाचे असले आणि जर अर्धरक्षक- मग कुठलाही का असेना-कमजोर असेल तर यश मिळविणे महाकठीण होऊन जाते. आक्रमण व चढाई या दोन्ही धोरणांचा त्याला चांगला सराव पाहिजे. वेळ आली तर तत्काळ फटका मारून गोल करण्याची संधी त्याने गमावता कामा नये ! "

## अजीतपालसिंगचे मत

भारताचे एक माजी ऑलिंपिक कप्तान व जगातला एक उत्कृष्ट मध्य अर्धरक्षक म्हणून गाजलेला खेळाडू, अजीतपालसिंग म्हणतो, "अर्धरक्षक हा पूर्णरक्षक व आघाडी यांच्यातला दुवा आहे. मध्य अर्धरक्षक हा संघाचा केंद्रबिंदू समजला जातो. या जागेवर पूर्वी लालशहा व पेंटिंगर यांच्यासारखे जागतिक कीर्तीचे खेळाडू होऊन गेले. त्यांच्याकडून आपण स्फूर्ती घेतली पाहिजे. मध्यबुली ( Centre Bully ) झाल्या-बरोबर चेंडूला जशी दिशा व गती मिळते त्यावरून मध्य अर्धरक्षकाला प्रतिपक्षातील कच्चे दुवे समजता आले पाहिजेत. तिन्ही अर्धरक्षकांनी एकमेकाला समजून घेणे अत्यंत महत्त्वाचे आहे. वैयक्तिक खेळापेक्षा सांघिक खेळाकडे जास्त लक्ष दिले पाहिजे. "

अर्धरक्षकाने प्रतिस्पर्ध्याच्या डावपेचापुढे माघार घेता उपयोगी नाही. एखादेवेळी त्याला माघार घ्यावी लागली अगर त्याचे धोरण कमकुवत ठरले तरी त्याने नामोहरम न होता प्रतिस्पर्ध्यांचा पिच्छा सोडता उपयोगी नाही. एकदा नाही, दोनदा नाही तर निदान तिसऱ्या प्रयत्नात त्याला नक्की यश मिळेलच.

आपल्याला जागांचे महत्त्व जितके चांगले समजले असेल तितके खेळाडूंतील एकमेकांतील समज व पुढील घडामोडींचा अचूक अंदाज यावर पुष्कळ अंशी चढाईचा

व बचावाचा खेळ अवलंबून असतो हे सर्वांनी लक्षात ठेवले पाहिजेच, पण त्यातल्या त्यात अर्धरक्षकांनी यांकडे विशेष लक्ष दिले पाहिजे.

प्रतिपक्षाचे हल्ले परतविणे हा एकच उद्देश मनात न ठेवता चढाईचे धोरणही मनात बाळगून आपल्या आघाडीला योग्य तऱ्हेने व योग्य वेळी चेंडूचा पुरवठा कसा होईल इकडे लक्ष देणे आणि त्या दृष्टीने चढाई करून गोल चढविण्यास मदत करणे हे अर्धरक्षकाचे मुख्य कर्तव्य आहे.

वरील सर्व विवेचन वाचून त्या दृष्टीने खेळाचा सराव करीत गेल्यास अर्धरक्ष-काच्या जागेवरचा खेळाडू नुसताच लायक होत नसून नक्कीच यशस्वी खेळाडू होऊ शकेल. पण प्रत्येक खेळाडूने निष्ठा, आत्मविश्वास, चिकाटी व मेहनत सतत ठेवली तर यश कधीही दूर नसते.

## आघाडीचे खेळाडू

आतापर्यंत खेळातल्या बचावाच्या जागांचा ऊहापोह झाला. खेळाचा जो मुख्य उद्देश गोल करणे त्यासाठी आघाडी अगर फॉरवर्डचे खेळाडू यांच्यावर त्याची सारी मदार असते. बचावाच्या खेळाडूंनी चेंडू आघाडीकडे देऊन त्याचा त्यांना काहीच फायदा करून घेतला नाही तर केलेले सारे श्रम वाया जातात. म्हणून प्रत्येक संघाची आघाडीची फळी अत्यंत चपळ व कार्यक्षम असणे अत्यंत जरुरीचे आहे.

आघाडीच्या खेळाडूंचे मुख्य काम म्हणजे मिळेल त्या संधीचा उपयोग करून प्रतिस्पर्ध्यांवर गोल मारणे हे असते, यासाठी त्यांच्यात मुख्यतः चपळाई असली पाहिजे. पण नुसतीच धावण्यात चपळाई नव्हे तर परिस्थितीचे झटकन आकलन, अंतराचा अंदाज व आडाखा, आणि प्रतिस्पर्ध्यांकडून त्वरेने चेंडू मिळवून तो गोलात मारणे या साऱ्या गोष्टी अती चपळाईने होणे अत्यंत जरुरीचे असते.

आतापर्यंत सर्वत्र रूढ असलेल्या पद्धतीप्रमाणे आघाडीला पाच खेळाडू असतात ते असे : डावी बगल, डाव्या बगलेच्या आतील, केंद्रमध्य, उजव्या बगलेच्या आतील आणि उजवी बगल.

हॉकी खेळात वैयक्तिक कौशल्यापेक्षा आघाडीच्या फळीचे एकमेकांतील समज व समन्वय यावरच पुष्कळ अंशी यश अवलंबून असते. ज्याने गोल लावला त्याचे कौतुक करून त्याला उचलून धरण्यापेक्षा त्याला गोल लावण्यात ज्यांच्याकडून खरी मदत झाली-मग ते पूर्णरक्षक असोत अगर बगलेचे खेळाडू असोत-त्यांनाच खरे श्रेय दिले पाहिजे, त्यांचेही कौतुक झाले पाहिजे.

आघाडी काय किंवा अर्धरक्षक काय त्यांनी ही खूणगाठ मारली पाहिजे की, कोणत्याही परिस्थितीत चेंडू स्वतःजवळ न ठेवता त्याला पुढे चलता करून दिशा दाखविली पाहिजे. तरच त्याचा उपयोग होईल. चेंडू तुमच्या जवळ येईल म्हणून वाट पाहात न थांबता नेहमी चेंडूवर स्वतःहून ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे—

हा पक्का नियम लक्षात ठेवावा. चेंडूवरील ताबा ( Ball control ), गती आणि डॉज वापरून मार्ग काढणे या गोष्टी आघाडीच्या खेळाडूंना अत्यंत जरूरीच्या आहेत. आघाडीच्या सगळ्या खेळाडूंनी हे पक्के लक्षात ठेवले पाहिजे की, कोणीही आपल्या जागेच्या कक्षेबाहेर जाता उपयोगी नाही आणि प्रत्येकाने एकमेकांपासून दूर राहूनच खेळले पाहिजे, नाहीतर गोंधळ माजून प्रतिपक्ष त्याचा फायदा उठवेल. अगदी जेव्हा जरूरी आहे व दुसरा मार्गच नाही त्याच वेळी फक्त वैयक्तिक नैपुण्य अगर कौशल्य उपयोगात आणावे. कारण वैयक्तिक खेळ खेळू लागल्याने चांगले चांगले समजले जाणारे संघ धुळीस मिळाले आहेत. हा अनुभव आहे, इतिहास आहे !

## केंद्रमध्य

केंद्रमध्य हा खेळाडू धडक मारणारा, ठाम निर्धाराचा, करारी, त्वरित निर्णय घेऊन क्षणाचाही विलंब न करता चेंडू मारणारा असावा लागतो. उत्तम व मजबूत शरीरयष्टी, उंचापुरा, चपळ, पदलालित्य व दांडकाकौशल्यात तरबेज, असा खेळाडूच या जागेला योग्य ठरतो. आपल्या दोन्ही बगलांच्या खेळाडूंशी योग्य संधान बांधण्याची त्याच्यात कुवत असली पाहिजे. चेंडू मारण्याची क्षमता, विघातक तऱ्हेने चेंडू डाव्या-उजव्या बाजूंना सहज टोलविणारा, शांत डोक्याचा वगैरे गोष्टींचा ज्याच्यात मिलाफ आहे असाच खेळाडू उत्तम केंद्रमध्य होऊ शकतो.

हल्ला करण्याच्या दृष्टीने केंद्रमध्य हा केंद्रबिंदू असतो आणि दोन्ही बाजूंच्या बगलेच्या खेळाडूंना चेंडू काढून देणे, आणि चेंडू सतत पुढे कसा वाढविला जाईल यासाठी जागरूक राहणे, ही मोठी जबाबदारी त्याच्यावर असते. चढाईचे धोरण व आखणी त्याला करावयाची असते. एखादी चाल जर अयशस्वी झाली तर लगेच दुसरा मार्ग तावडतोब अमलात आणण्याची क्षमता त्याच्यात असावी लागते. प्रतिपक्षाच्या मध्य अर्धरक्षकाचे सर्व बेत व धोरणे कशी धुळीला मिळविता येतील यासाठी त्याला चाणाक्ष व तत्पर राहणे अत्यंत महत्त्वाचे असते. गोलाधीच्या जवळपास आल्यानंतर केंद्रमध्याने क्षणाचाही विलंब न करता कुठूनही आलेला चेंडू घेऊन तो गोलात, धडकविण्याची तयारी ठेवली पाहिजे. प्रसंगी वैयक्तिक जबाबदारीवर प्रतिपक्षाची कुवत ओळखून ' फिल्ड गोल ' किंवा वैयक्तिक जबाबदारीवर गोल करण्याचीही धमक त्याच्यात पाहिजे.

## कै. ध्यानचंद यांच्या सूचना

' हॉकीचे जादूगार ' व जागतिक कीर्तीचे अद्वितीय खेळाडू कै. ध्यानचंद यांनी केंद्रमध्य व इतर आघाडीच्या खेळाडूंना दिलेल्या सूचना फारच महत्त्वाच्या आहेत. ते म्हणतात, " आक्रमकांचा नेता म्हणजे केंद्रमध्य. यासाठी त्याचे लक्ष चौफेर असले पाहिजे. आपल्या बरोबरीच्या इतर आघाडीच्या खेळाडूंना चेंडू कसा व केव्हा देता येईल याचे त्याला ध्यान पाहिजे. कोणत्याही प्रसंगी आघाडीच्या खेळाडूंनी एकत्र येता उपयोगी

नाही. काही वेळा केंद्रमध्याला स्वतःच चेंडू पुढे घेऊन जाणे भाग पडते. त्यासाठी गती व दंडिकाकौशल्य यांत तो निष्णात असला पाहिजे. जो खेळाडू केवळ आपल्या खेळाचा व फायद्याचा विचार करून खेळतो त्याच्यापासून संघाला अतिशय धोका असतो. एकदा का गोलार्धात चेंडू आला की तो जितक्या त्वरित व जोराने गोलात मारणे हेच मुख्य कार्य. त्याला दुसरा पर्याय नाही. परंतु कोणत्या कोनातून व कोणत्या बाजूने गोलकडे फटका मारल्यास तो फलदायी ठरेल याचा एका क्षणात त्याने निर्णय घेतला पाहिजे.

"गोलरक्षकापासून किती दूर व कोणत्या बाजूनी चेंडू मारल्यास यश येईल याचा अंदाज व ती वेळ अचूक साधता आली पाहिजे. गोलरक्षक काय तऱ्हेचा आहे, झडप मारतो की बाजूने चेंडू अडविण्यात हुषार आहे याच्या अनुमानाने चेंडू गोलात ढोलविला पाहिजे. प्रतिपक्षाच्या बचावाचा अंदाज लागला की त्याप्रमाणे आपली हालचाल ठेवली पाहिजे.

"चेंडू मारून मोकळा होण्याची घाई करून फायदा नाही. गोल करण्याची संधी कशी येईल, त्याचा फायदा कसा घ्यावा हे त्याने जाणले पाहिजे. आपल्यापुढे प्रतिपक्षाचे सर्व खेळाडू आहेत व चेंडू पुढे जाणे कठीण तेव्हा त्याने आपल्या मध्य अर्धरक्षक अगर अन्य अर्धरक्षकांशी संपर्क ठेवून तावडतोब 'बॅक पास' करून म्हणजेच चेंडू मागे देऊन आपण पुढे सटकले पाहिजे व शक्यतो गोलार्धाच्या जवळपास जाऊन पोचले पाहिजे. परंतु यासाठी खेळाचे असे पक्के नियम नाहीत व हालचालही ज्याने त्याने परिस्थितीचा अंदाज घेऊन व बुद्धी चालवून केली पाहिजे.

'डब्ल्यू' ( W ) पास करून चेंडू केंद्रमध्याकडे देण्याने गोल करण्याचे कार्य जास्त सुलभ होते हे सर्वांनी लक्षात ठेवले पाहिजे.

"आघाडीच्या खेळाडूंना फटका, सरकफटका, झटकफटका व उचलफटका यांचा चांगला सराव असला पाहिजे. आघाडीच्या खेळाडूंनी शक्य तो जोरकस फटका मारू नये. ढोलविणे व सरकफटका यांचा चांगला उपयोग करावा. धावताधावता डावी-कडून उजवीकडे चेंडू देताना झटकफटका मारतात. शक्य तितक्या जलदीने चेंडू पुढे जावा हा यामागील उद्देश आहे. अडचणीच्या प्रसंगी उचलफटका मारल्यास चेंडूवर ताबा मिळविण्यास व प्रतिस्पर्ध्यांना गोंधळात टाकण्यास मदत होते."

## श्री. बलबीरसिंग यांचा सल्ला

कै. ध्यानचंदांच्या प्रमाणेच केंद्रमध्य म्हणून नाव कमाविलेला व भारताचे ऑलिंपिक हॉकीमध्ये ज्यांनी नेतृत्व केले होते असा सुप्रसिद्ध हॉकीपटू बलबीरसिंग याचे म्हणणे, 'चढाई हाच एक बचावाचा उत्तम मार्ग आहे.' ( Attack is the best way of Defence ). हे तत्त्व केवळ सैन्यातच लागू न करता खेळातही उपयोगात आणले पाहिजे. जो संघ अत्यंत ईर्षा व आत्मविश्वासाने मैदानात उतरून प्रतिपक्षाबरोबर मुकाबला करतो त्याला यश मिळविणे कठीण जात नाही. परंतु केवळ बचावाचे धोरण



श्री. बलबीरसिंग

बेऊनच खेळ खेळला तर सहज कोणाच्याही चुकीने गोल होऊन पराभव होण्याचा संभव असतो. अर्ध व पूर्णरक्षक प्रतिपक्षाचे हल्ले परतविण्यात जितके तत्पर व कार्यक्षम असतील त्या प्रमाणात आघाडीच्या खेळाडूंचा खेळ जोरदार होईल. सर्व खेळाडूंचे एक-मेकांत पुरे संगनमत असले पाहिजे आणि सगळे सांघिक भावनेने खेळले पाहिजेत. केंद्रमध्याने नेहमी आपल्या जागेपासून दूर राहता उपयोगी नाही. त्याची जागा म्हणजे मैदानाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंतचा बगलेच्या आतील बाजूच्या खेळाडूंच्या मधला पट्टा असे समजले पाहिजे. प्रसंगी तो जर त्या जागेपासून इतरत्र गेलाच असेल तर शक्य तितक्या त्वरित त्याने आपल्या जागी हजर झाले पाहिजे. त्याचे सदैव इतर खेळाडूंकडे लक्ष असले पाहिजे, कारण वेळ आली तर त्याला जरूर त्या ठिकाणी मदतीला जाणे जरूर असते.

" दंडिका अगदी सहज वापरता यावी यासाठी टेनिसचा चेंडू भिंतीवर मारून तो आडविण्याची व मारण्याची रोज १/१½ तास त्याने संवय केली पाहिजे, तसेच इंग्रजी आठ ( 8 ) आकडा काढून दंडिकेने त्या आकड्यावरून चेंडू नेण्याचा सराव केला पाहिजे. त्याचप्रमाणे चार फुटांच्या अंतरावर आठ खुंट्या रोवून त्यामधून आतबाहेर असे चेंडू घेऊन धावण्याचा सराव केला पाहिजे.

" आघाडीच्या खेळाडूंना असा दृढ आत्मविश्वास असला पाहिजे की, माझ्या-समोर कोणताही बचाव टिकू शकणार नाही. पण त्याचबरोबर त्यांना गर्वही असता उपयोगी नाही, तसेच डोके शांत ठेवले पाहिजे. कुणाच्याही हातून चूक झाली तरी राग येऊन चालणार नाही.

" खडबडीत, टणक, उंचसखल, ओले, नैसर्गिक अगर कृत्रिम हिरवळ वगैरे सारख्या मैदानावर खेळण्याचा सराव ठेवला पाहिजे, कारण त्यामुळे केव्हाही प्राप्त परिस्थितीला तोंड देणे सुलभ होते. "

## बगलेवरील खेळाडू

केंद्रमध्याच्या डाव्या व उजव्या बाजूला दोन दोन खेळाडू असतात. ते म्हणजे बगलेच्या आतील व बाहेरील खेळाडू. या जागांवर उत्तम तऱ्हेने व यशस्वी रीत्या खेळावयाचे झाल्यास खेळाडूच्या अंगी गतिमानता हा गुण असणे महत्त्वाचे आहे. विशेषतः डाव्या बगलेच्या खेळाडूला फारच सावधगिरीने व चपळाईने हालचाल करणे अत्यंत जरूर असते. ही जागाच अशी आहे की, चेंडू आला की तो तत्काळ ताब्यात घेऊन पुढे आपल्याच खेळाडूला कसा देता येईल हे ध्यान राहणे कठीण असते. कारण चेंडू हा शरीराच्या डाव्या बाजूनेच नेण्यात येथे कौशल्य असते. प्रतिस्पर्ध्याचीही उजवी बाजू असते व त्याला मुकाबला करणे सोपे असते. यासाठी आपल्या बगलेबाहेरचा डावी-कडचा खेळाडू आणि केंद्रमध्य यांच्यात त्याला सतत समन्वय ठेवावा लागतो आणि त्यांच्याच बरोबरीने त्याला हालचाल करावी लागते. उजव्या बाजूच्या बगलेचा आतला खेळाडू यालाही हीच गोष्ट लक्षात ठेवावी लागते, पण त्याची बाजू जरा सोपी असते.

बगलेच्या खेळाडूंना गतीबरोबरच दृष्टीही तीक्ष्ण ठेवावी लागते. या खेळाडूंनी अगदी नाइलाज झाला व त्यांच्याशिवाय प्रतिस्पर्ध्याला थोपवायला कोणी नसेल तेव्हाच आपली जागा सोडावी. बगलेच्या आतल्या खेळाडूने बाहेरचा व केंद्रमध्य खेळाडू यांच्या-मध्येच नेहमी राहिले पाहिजे आणि बाहेरच्या खेळाडूंनी ( wingers ) बाजूच्या रेषेला समांतर अशी सात यार्डांची रेषा असते त्यामध्येच सदैव असले पाहिजे.

केंद्रमध्य हा भिंगरीसारखा सर्वत्र फिरत असतो. त्याच्या डाव्या व उजव्या बाजूला असलेल्या खेळाडूंवरच बहुधा गोल करण्याची भिस्त असते व त्यांना तशी संधीही असते व वावही मिळतो.

### श्री. भोलाचा अनुभव

भारतीय संघातील बगलेचा खेळाडू व कोच म्हणून नाव कमावलेला श्री. आर. एस. भोला याच्या मते, "गोल करण्याचे काम बहुतेक बगलेच्या आतील खेळाडूच करतात. यासाठी बाजूच्या खेळाडूंचे ( wingers ) मुख्य कार्य म्हणजे प्रतिस्पर्ध्यांची बचाव फळी तोडून पुढे घुसणे, चेंडूला बगलेच्या आतल्या खेळाडूकडे (Inside Player) टोलविणे, म्हणजे त्याला गोल करणे सोपे होते. त्यातल्या त्यात डाव्या बगलेच्या खेळाडूची कामगिरी फार कठीण असते. बगलेवरील खेळाडू अती चपळ म्हणजे वाऱ्याप्रमाणे धावणारे असले पाहिजेत. ज्या संघात वेगवान खेळाडू आहेत तो संघ प्रतिस्पर्ध्यांना हमखास भारी ठरतो. त्यासाठी त्याने पुढील बाबींकडे लक्ष दिले पाहिजे. ( अ ) चेंडूबरोबर जोराने पळत जाऊन फटका मारण्यापूर्वी अर्ध वळले पाहिजे, ( ब ) मागल्या हातांनी चेंडूला झटकफटका मारता आला पाहिजे आणि ( क ) धावता चेंडूला सरकफटका मारता यावा म्हणून अर्ध वळता आले पाहिजे. बर्लिन येथे १९३६ साली झालेल्या ऑलिंपिक हॉकी सामन्यांत भारताकडून खेळलेला स्वर्गीय मोहम्मद जाफर याने डाव्या बगलेवर खेळून अती उत्कृष्ट कामगिरी केली होती."

### उधमसिंगचा अभिप्राय

भारतीय हॉकी संघातील असाच एक भरवशाचा आघाडीचा खेळाडू सरदार उधमसिंग म्हणतो, "आक्रमकांचा नेता जसा केंद्रमध्य तद्वतच बगलेच्या आतले खेळाडू हेही 'भेदक तडाकेबाज' किंवा 'शार्पशूटर्स' म्हणून समजले जातात. अनुभवावरून असे दिसून येते की, बगलेच्या आतील खेळाडूमुळेच सामना जिंकला जातो. यासाठी कुशलता, गती, शरीराचे चापल्य, चेंडू पास करण्याचे कौशल्य व निःस्वार्थ भावना हे गुण या खेळाडूंच्या अंगी असावे लागतात. गोलार्धामध्ये असताना तत्क्षणी या खेळाडूंनी गोलात चेंडू मारलाच पाहिजे. कारण त्यांच्या इतकी, दुसऱ्या कोणालाही ही संधी मिळत नाही."

### महत्त्वाचे मुद्दे

आता आघाडीच्या प्रत्येक खेळाडूची जागा व महत्त्व पाहिल्यानंतर, या आघाडीच्या पाचही खेळाडूंनी पुढील गोष्टी पक्क्या लक्षात ठेवाव्यात.

( १ ) जेव्हा गोलार्धात असाल तेव्हा चेंडू तावडतोब मारा. शक्य तो गोलाजवळ राहू नका.

( २ ) पहिल्याच झटक्याला मारलेल्या फटक्यामुळे गोलरक्षकाला हालचाल करायला वेळच मिळत नाही हे लक्षात ठेवा. थोडासा जरी उशीर झाला तरी प्रतिस्पर्ध्यांना त्याचा फायदा उठविता येतो.

( ३ ) काहीही करून जोरदार फटका मारण्याची संधी दवडू नका. पुष्कळ वेळा

कच्चा फटका गोलरक्षक अगदी सहज तटविण्याचा प्रयत्न करतो म्हणून तसलेच फटके काही वेळा गोल मिळवून देतात. तेव्हा अशी संधी घालवू नये. गोलरक्षकाच्या पाय-पटांना लागून चेंडू उसळी मारून काही वेळा परत येतो, त्याचा फायदा उठविण्याची धडपड करा.

( ४ ) कधी कोनातून फटके मारू नका. स्वतःला गोल मारणे जमणार नसेल तर आपल्या भिडूकडे तिरका अगर मागे चेंडू टोलवून गोल मारण्यास मिळालेली संधी वाया दवडू नका.

( ५ ) वर्तुळाच्या शक्यतो ५ ते १० यार्ड अंतरावर राहण्याचा नेहमी प्रयत्न करा.

( ६ ) कुणीही जरी फटका मारला असला तरी चेंडूमागोमाग गोलात घुसा. संधी मिळेल.

( ७ ) प्रत्येकाने आपल्या जागेच्या मर्यादा ओळखूनच खेळले पाहिजे म्हणजे गोंधळ होत नाही.

( ८ ) बाजूच्यांनी केंद्रमध्याशी व केंद्रमध्याने बाजूच्यांशी नेहमी समन्वय साधला पाहिजे आणि चेंडूची देवाणघेवाण दोघांनी चपळाईने केली तर फटका मारून चेंडू पुढे वाढविण्याची वेळच येणार नाही.

( ९ ) आतला व बाहेरचा खेळाडू यांनी आपापल्या जागा अधूनमधून बदलून खेळावे म्हणजे प्रतिपक्ष गोंधळात पडतो.

(१०) आपण बाजूबाहेर होणार नाही याची दक्षता घ्यावी, नाहीतर केलेले श्रम फुकट जातील.

आघाडीच्या खेळाडूंना नुसता वेग असून चालणार नाही तर त्यांच्यात चलाखी व स्वराही पाहिजे. जेव्हा प्रतिपक्ष आपल्यावर दबाव आणतो त्या वेळी बचावाचे खेळाडू आपल्या बगलेकडेच चेंडू देणार. यासाठी बगलेच्या खेळाडूंनी बाह्य रेषेच्या ( Side Line ) जवळच असले पाहिजे. प्रतिस्पर्ध्यांच्या ताब्यातून चेंडू कसा मिळविता येईल, यासाठी धाडसपणे धडपड केली पाहिजे. त्याचा पाठलाग करणे, अडथळा आणणे, त्याचे लक्ष विचलित होईल अशा तऱ्हेने हालचाली करणे, अशी त्याने धडपड केली की प्रतिस्पर्धी गोंधळून जातो आणि चेंडूवरील ताबा सुटण्याचा संभव असतो.

नेहमी ( १ ) प्रतिस्पर्ध्याला पुढे ओढल्याशिवाय चकवायचे नाही आणि ( २ ) पुढे चेंडू टोलवायचा या दोन महत्त्वाच्या गोष्टी आहेत. चेंडू केव्हाही जमिनीबरोबरच राहू द्यावा व टोलविताना अगर ढकलताना तो असा गेला पाहिजे की, घेणाऱ्याला जलद पळता पळता देखील दांडिकेवर घेता आला पाहिजे.

आघाडीच्या खेळाडूंनी केव्हाही दांडिकेवरच पास घेतला पाहिजे.

चेंडू हा शक्यतो आपल्याजवळच्याच माणसाकडे दिला पाहिजे. परंतु पुष्कळदा जे आघाडीचे खेळाडू मोकळे आहेत अशांच्या कडेच चेंडू दिला तर त्याचा उपयोग होतो.

बगलेच्या खेळाडूंनी केंद्रमध्याकडे अचूक व योग्य वेळीच चेंडू देण्याचे धोरण ठेवले पाहिजे. शक्यतो २५ याडांची रेषा गाठली की, लगेच चेंडू आत केंद्रमध्याकडे टोलवावा. हे वाटते तितके सोपे नाही ! असा चेंडू टोलवणे अचूक व आपल्या खेळाडूच्या पुढेच येईल असे झाले पाहिजे. मागे वळून चेंडू घेणे हे पुष्कळ वेळा डाव्या बगलेकडून चेंडू येताना करावे लागते. पण शक्यतो ते तसे करावे लागू नये याची दक्षता घ्यावी. या साऱ्या हालचाली सरावाने साध्य होतात.

जेव्हा घुसण्याची अगर चढाईची वेळ असते त्या वेळी पूर्णरक्षकाने पुढे येऊन फटका मारण्याची वाट न पाहता, जो खेळाडू जवळ असेल, विशेषतः अर्धरक्षकाने झटकन फटका मारावा. कारण मधे जर थोडा वेळ गेला तर प्रतिपक्षाच्या आघाडीच्या खेळाडूंना चेंडू ताब्यात घेण्याला वाव दिल्यासारखे होते.

हल्ला चढविणारे किंवा गोलात फटका मारणारे बहुधा तीन खेळाडू असू शकतात. ते म्हणजे केंद्रमध्य व त्याच्या डाव्या-उजव्या बाजूचे बगलेच्या आतले खेळाडू. यासाठी त्यांनी आपापल्या जागीच हालचाल करीत चेंडू आलाच की तो गोलवर्तुळात तत्काळ कसा पोहोचवता येईल या दृष्टीने जागरूक राहिले पाहिजे. बगलेच्या खेळाडूने फक्त संधी आली तरच गोलमध्ये जोरकस फटका मारण्याचा प्रयत्न करावा. त्याने हे लक्षात ठेवले पाहिजे की, कोनातून मारलेला चेंडू क्वचित वेळा गोल करू शकतो. म्हणून त्याने शक्यतो चेंडू गोलात आपणच मारण्याचा मोह टाळून तो आतल्या खेळाडूकडे द्यावा हे उत्तम.

गोलार्ध वर्तुळामध्ये केव्हाही अचूक फटका हा महत्त्वाचा असतो. उगाच रामभरोसे टोला उपयोगी नसतो.

जेव्हा आघाडीच्यापैकी एकाने चेंडू गोलात मारलेला असतो त्या वेळी इतर आघाडी खेळाडूंनी गोलरक्षकावर गर्दी केली पाहिजे. कारण अशी भाऊगर्दी करण्यानेच पुष्कळदा गोल होऊ शकतात.

शक्यतो 'फिल्डगोल' करण्याचा प्रयत्न करणे चांगले. पण हल्ली कोपऱ्यावर ( corner ) गोल मारण्याचा सपाटा दिसून येतो. तेव्हा कोपऱ्याचा फटका मारण्याची संपूर्ण योजना तयार पाहिजे. कोपरा फटका कुणी मारावयाचा, चेंडू कुणी अडवावयाचा व कुणी गोलात फटका ठोकायचा, याचा उत्तम तऱ्हेने व पद्धतशीर रीतीने सराव केला पाहिजे.

कोपरा-फटका मारणाऱ्याने चेंडू सरळ पण जोरदारपणे दंडिका उंच न करता अचूक मारला पाहिजे. ज्याने चेंडू अडवावयाचा त्याने तो 'डेडस्टॉप' म्हणजे अगदी तिथल्यातिथेच हातांनी अडवावा व त्याच क्षणी अडविणाऱ्याच्या डाव्या हाताला असणाऱ्याने तो जोराने गोलात मारावा. हीच खरी कोपरा मारण्याची यशस्वी पद्धत आहे. याच वेळी इतर आघाडीच्या लोकांनी शक्यतो फटका मारला गेल्याबरोबर गोलरक्षक व बचावफळी यावर हल्ला करून त्यांना गोंधळात टाकले पाहिजे.

आघाडीच्या खेळाडूंनी नेहमी एकमेकांच्या सहकार्याने खेळात जीव ओतून प्रयत्न केले पाहिजेत. जरी एखादेवेळी प्रतिस्पर्ध्यांनी त्यांचा 'मामा' केला तरी नामोहरम न होता पाठलाग सोडता उपयोगी नाही. लगेच मागे पळले पाहिजे, जागीच थांबू नये; कारण त्यांच्या मागे जाण्याने आपल्या बचाव फळीला पुष्कळ उपयोग होतो.

या साऱ्या सविस्तर वर्णनावरून आघाडीच्या प्रत्येक खेळाडूच्या जागेचे काय वैशिष्ट्य आहे व ते किती महत्त्वाचे आहे हे स्पष्टपणे कळून येईल. यासाठी उत्तम व यशस्वी आघाडीवीर व्हावयाचे असेल तर वरील साऱ्या गोष्टी लक्षात ठेवून त्या आपल्याला कशा आत्मसात करता येतील याचा प्रत्येकाने विचार केला पाहिजे. त्याप्रमाणे आपण कोणत्या स्थानावर चांगले खेळू व तिथे प्राविण्य मिळवू आणि कौशल्य दाखवू, याचा त्याने विचार करावा. एकदा एका जागेबद्दल विचार पक्का झाला की, त्या जागेसाठी जो काही सराव असेल तो करून व योग्य त्या ठिकाणी शिक्षक अगर कोच यांचा सल्ला घेऊन त्याप्रमाणे तनमनाने खेळ खेळल्यास अवघड व अशक्य असे काहीच नाही!



## प्रकरण ७

# खेळातील डावपेच, संघभावना व संघनायक

आतापर्यंत हॉकी खेळासंबंधी पुष्कळच तात्त्विक माहिती मिळाली. तसेच खेळाडूंचे कार्य व त्यांच्या जागा वगैरेसंबंधी गेल्या प्रकरणात बरेच विवेचन झाले आहे. आता दोन संघांत होणारे जे सामने असतात ते खेळताना काय डावपेच लढवावेत वगैरेसंबंधी थोडे विवेचन होणे जरूर आहे.

आपल्याला चांगले खेळता यावे म्हणून खेळाचा भरपूर सराव करणे अत्यंत जरूर आहे. परंतु ज्या विशिष्ट खेळाच्या अगर कृतींचा आपण सराव करतो तो प्रत्यक्षात कितपत फलदायी होतो व त्यामध्ये प्रभुत्व मिळाले किंवा कसे हे प्रत्येक खेळाडूला समजावयाचे झाले तर त्यांनी पुष्कळ सामने खेळले पाहिजेत. सामने खेळण्याचा उद्देश प्रतिस्पर्धी संघावर मात करून विजय प्राप्त करून घेणे हा असतो. म्हणून उत्तम कोच किंवा शिक्षकाने प्रत्येक खेळाडूच्या मनावर हे बिंबविले पाहिजे की, प्रतिस्पर्ध्याला कोणत्याही परिस्थितीत पराभूत करून मला सामना जिंकावयाचा आहे !

सामना खेळण्यासाठी जेव्हा संघ मैदानावर उतरतो त्या वेळी त्याला प्रतिस्पर्धी संघाचे बळ कसे आहे याची थोडीशी कल्पना दिलेली असते. पण जेव्हा प्रत्यक्ष खेळाला सुरुवात होते त्याच वेळी त्याचा पडताळा येतो आणि त्यावरूनच आपल्या संघाने काय डावपेच करावयाला पाहिजेत याची कल्पना येते व ती विशेषतः संघनायक व संघातर्फे अनुभवी व मुरब्बी खेळाडू बरोबर हेरतात व त्याप्रमाणे डावपेचांना सुरुवात होते.

### संघाची रचनापद्धत

परंतु काही झाले तरी मैदानावर संघाची रचना कशी असावी व त्यात आपण कितपत यशस्वी होऊ याला जास्त महत्त्व आहे. परंपरागत चालत आलेली १–२–३–५ ही रचनापद्धतच योग्य आहे, असे आतापर्यंतच्या अनुभवावरून लक्षात आलेले आहे, म्हणून ती सोडून देऊ नये. युरोपीय संघ बहुतेकदा बचाव फळी जास्त मजबूत राखून संघाची रचना १–२–४–४ अशी करतात. यातही आणखी बदल करून गोलरक्षकापुढे त्याला साहाय्यक म्हणून आणखी एक खेळाडू गोलार्धवर्तुळापाशीच असतो म्हणजे १–१–४–२–३ अशीही रचना असते. पण त्यात विशेष काही साध्य होत नाही, उलट गोंधळ निर्माण होतो असा अनुभव आहे. तसेच पुष्कळ इतर परदेशी संघ १–४–२–४

अशी फुटबॉल संघाच्या धर्तीवर रचना करतात. जो संघ केवळ बचावाचेच धोरण अवलंबितात ते १–१–४–३–२ अशा रचनेने खेळतात.

पण आशियातील भारत, पाकिस्तान, मलेशिया, जपान वगैरे देशांचे संघ हे परंपरागत जुनी पद्धतच वापरत आले आहेत आणि त्यामुळेच त्यांना विजय प्राप्त करणे सोपे जाते असे दिसून येते.

## मैदानाचे स्वरूप

मैदानात उतरण्यापूर्वी मैदान टणक आहे, ओले आहे, साधी हिरवळ आहे, की कृत्रिम हिरवळ आहे यासंबंधीची दखल घेऊन त्याप्रमाणे कोणते डावपेच अमलात आणावयाचे याबद्दल संघातल्या खेळाडूंनी चर्चा करून मग आपल्या खेळाचे धोरण ठेवले पाहिजे.

खेळाचा उद्देश प्रतिस्पर्ध्यांवर मात करण्याचा असल्याने प्रत्येक खेळाडूने आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे.

## चेंडू टोलविण्याचे धोरण

कोरड्या, टणक व जलद ( Fast ) मैदानावर आघाडीच्या खेळाडूंनी जर शॉर्ट पासेसचे तंत्र अवलंबिले तर ते जास्त फायद्याचे ठरते. परंतु शॉर्ट पासेसमध्ये अचूकता असणे फार महत्वाचे आहे. त्याचबरोबर जर लाँग व शॉर्ट पासेसचे मिश्रण करीत खेळ खेळला गेला तर प्रतिपक्षात गोंधळ निर्माण होतो व त्याचाच आपण फायदा करून घेतला पाहिजे. कृत्रिम हिरवळीवर दंड अगर साधा कोपराचा फटका आडविताना हे लक्षात ठेवले पाहिजे की, चेंडूला थोडीशी फिरकी असते आणि त्याप्रमाणे चेंडू आडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

ओल्या व घसरड्या मैदानावर शॉर्ट पासेसचा फारसा उपयोग होत नाही, म्हणून तिरके फटके व कडेच्या खेळाडूंकडे चेंडू सतत टोलविण्यात फायदा होत असतो. याचे कारण प्रतिपक्षाच्या अर्धरक्षकांना चेंडू त्यांच्या हातून निसटला की, लगेच मागे वळून चेंडूमागे धावणे कठीण जाते.

संघाचे डावपेच पुष्कळदा मैदान व वेळची परिस्थिती यावर अवलंबून असतात. जर मैदान मऊ असेल तर लांब पासेस व जोरदार फटके किफायतशीर ठरू शकतात. पण मैदान पक्के व एका पातळीचे असेल तर शॉर्ट पासेस व अधूनमधून तिरके पासेस फार उपयोगी पडतात.

## चढाई व बचाव

प्रतिपक्षाची आघाडी जर जास्त जलद व भारी असेल तर आपल्या आघाडीच्या खेळाडूंनी 'माणसास माणूस' ( Man to man ) धोरणाप्रमाणे सतत आपल्या प्रतिस्पर्धी खेळाडूचा पिच्छा सोडावयाचा नाही व अर्धरक्षकांनी आपापल्या जागांवर मोठ्या तत्परतेने मुकाबला करणे फार महत्वाचे आहे.

प्रतिपक्षाची कमकुवत जागा कोणती याचा अंदाज संघनायकाला झटकन करता आला पाहिजे आणि त्याचा त्याने शक्य तितक्या लवकर फायदा उठविला पाहिजे.

' चढाई हाच बचावाचा उत्तम मार्ग आहे, ' असे नेहमी म्हटले जाते आणि ते पुष्कळ अंशी हॉकीच्या खेळात उपयोगी पडते. आता चढाई करणे किंवा हल्ला चढविणे यांत दोन प्रकार आहेत. केंद्रमध्याने सतत प्रतिस्पर्ध्यांवर दबाव आणावयाचा आणि बगलेच्या खेळाडूंचा अधूनमधून उपयोग करून घ्यावयाचा हा एक प्रकार व दुसरा म्हणजे शक्य तितका वेळ बगलेच्या खेळाडूंकडून चेंडू प्रतिस्पर्ध्यांच्या गोलापर्यंत नेण्याची धडपड करावयाची. त्यासाठी आतल्या बाजूचा व बाहेरच्या बाजूचा खेळाडू यांचे एकमेकांशी संगनमत होऊन त्यांना तसे इतरांकडून साहाय्य मिळाले पाहिजे.

नेहमीच शॉर्ट पासेस यशस्वी होतात असे नाही. तर मधून मधून तिरके फटके व लॉंग पासेस कसे वापरावयाचे याचे धोरण ठरविता आले पाहिजे. यासाठी पुष्कळ वेळा ' झिगझॅग पास ' चा चांगला उपयोग होतो. ( आकृती ७·१ )



आकृती ७·१ : झिगझॅग पास

केंद्रमध्य व मध्यार्धरक्षक या दोन खेळाडूंवर अनुक्रमे चढाई व बचाव यांची जास्त जबाबदारी असते. म्हणून या जागी खेळणारे खेळाडू नेहमी तत्पर व अती चपळ असले पाहिजेत.

जे डावपेच लढविले जातात त्याचा पाठपुरावा प्रत्येक खेळाडूने केला पाहिजे, कारण हा खेळ सांघिक भावनेने खेळला जावयाचा असतो. " आघाडीचे खेळाडू गोल चढविण्याचे काम पाहतील. मला त्याचे काय ? " ही वृत्ती पूर्णरक्षकांनी ठेवता उपयोगी नाही. प्रत्येकाने आपली जबाबदारी तर पार पाडलीच पाहिजे, पण एकजुटीने प्रयत्न केल्यास त्यात संघाचा फायदा आहे, ही जाणीव प्रत्येक खेळाडूला असली पाहिजे. टीमवर्क, संघशक्ती व उत्तम धोरण अगर योजना या केव्हाही विजयाकडे नेणाऱ्या महत्त्वाच्या बाबी आहेत, हे सर्वांनी लक्षात ठेवले पाहिजे.

## सांघिक खेळ

सांघिक खेळाला प्राधान्य दिले तरच खेळात संघभावना टिकते. हल्ली या संघभावनेचा अभाव असल्यामुळे वैयक्तिक कौशल्य दाखवून प्रेक्षकांना खुष करून त्यांच्याकडून वाहवा मिळविण्याचे खूळ खेळाडूंच्या अंगात शिरले आहे, ते प्रथम काढून टाकले पाहिजे. यासाठी समन्वयावर भर देऊन 'फिल्ड गोल्स' कसे करता येतील याकडे जास्त लक्ष केंद्रित केले पाहिजे. कोपरा अगर दंड कोपऱ्यावर हल्ली भर दिला जात आहे. म्हणजेच दुसऱ्या संघाने केलेल्या चुकांवर आम्ही अवलंबून राहतो आणि त्याचा फायदा उठविण्यासाठी पंचांच्या मर्जीची अपेक्षा करतो. पण हे का ? आपल्या ताकदीवरच खेळ जिंकला पाहिजे ही जाणीव खेळाडूंनी मनात पक्की बिंबविली पाहिजे.

आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या अगर इतर कोणत्याही हॉकी स्पर्धेत एखाद्या संघाने किती 'फिल्ड गोल्स' केले याला खरे महत्त्व आहे. यासाठी जास्तीत जास्त फिल्ड गोल्स करण्याची संघाने तयारी केली पाहिजे. त्यासाठी व्यक्तिगत आणि सांघिक कौशल्याचा पूर्णपणे उपयोग करून घेऊन विरोधी संघावर कायम दबाव टिकविता आला पाहिजे. म्हणून संघात ऐक्यभावना जोपासली पाहिजे आणि आत्मकेंद्रित खेळाला फाटा दिला पाहिजे.

निरनिराळे डावपेच लढविण्यासाठी आघाडीच्या व अर्धरक्षक खेळाडूंत कल्पनाशक्ती चांगली असली पाहिजे आणि ती कार्यान्वित करून सफलता मिळवण्यासाठी अंगात चापल्य, धडाडी पाहिजे.

## कोपरे

वर म्हटल्याप्रमाणे हल्ली कोपरे अगर दंडकोपरे व दंडफटके यांवर भर देऊन गोल करण्याचे तंत्र जास्त उपयोगात आणले जात आहे. त्यात आपणही मागे असता उपयोगी नाही, हेही तितकेच खरे आहे. पण त्यासाठी आपण किती तयारी करतो व आतापर्यंत किती केली होती, त्याचे फलित काय मिळाले याचे एक उदाहरण पाहा. १९७६ च्या मॉन्ट्रियल येथल्या ऑलिंपिकमध्ये भारताला दंडकोपरे, कोपरे व दंडफटके किती बहाल झाले होते व त्याचा आपण किती उपयोग करून घेतला ते पाहा :–

| प्रकार | मिळाले | गोल केले |
|---|---|---|
| दंडकोपरे ( Penalty Corner ) | ३९ | ५ |
| कोपरे ( Corners ) | ३२ | १ |
| दंडफटके ( Penalty Stroke ) | ५ | ३ |

त्या मानाने इतर देशांनी याची पुष्कळच तयारी केली होती हे स्पष्ट दिसून आले होते. तेव्हा या 'कोपरे' व 'फटके' यांवर संपूर्ण प्रावीण्य मिळवावयाचे झाल्यास खेळाडूकडून खास तयारी करून घेतली पाहिजे. अलीकडे सामने हरणे वा जिंकणे हे पुष्कळ अंशी कोपरे मारण्यात जितकी प्रगती असेल त्यावर अवलंबून असते असे समजले

जाते. म्हणून ' कोपरे ' मारण्याचा सतत सराव केला पाहिजे. ' कोपरे ' मारताना नेहमी एकाने चेंडू अडवून लगेच तो दुसऱ्याने गोलात मारला पाहिजे आणि चेंडू आडविण्याचा व मारण्याचा सराव अगदी १०० टक्के पक्का झाला पाहिजे. काही वेळा दोन जोडया (आडविणे व मारणे) तयार ठेवाव्यात. उद्देश हा की, प्रतिपक्षीयांना नक्की कोणाकडे चेंडू मारला जाणार आहे व कोण फटका मारणार आहे याचा अंदाज येऊ नये हा असतो.

सरदार बलबीरसिंगने एके ठिकाणी म्हटले आहे की, " आपले कोपरे व दंड-फटके मारणारे तरबेज म्हणून समजले जाणारे गडी, जितका सराव करायला हवा तितका करीत नाहीत. सगळे ' पी हळद नी हो गोरी ' या वृत्तीचे आहेत. त्यामानाने इतर देशांतले खेळाडू, विशेषतः पश्चिम जर्मनी व डच खेळाडू म्हणजे त्यांचे अर्धरक्षक अतोनात मेहनत करतात. एकदा त्यांनी एका आठवड्यात २,००० दंडकोपरे मारण्याचा सराव केला होता. त्यामुळे फटक्याचा जोरकसपणा व अचूकता याबर ताबा मिळविता येतो याची त्यांना खात्री होती. एकाच्या जबाबदारीवर कोणताही सामना जिंकला अगर हरला जात नाही. एखादे तेल घातलेले मशीन जसे न कुरकुरता व्यवस्थित काम देते तद्वतच संघाची स्थिती असली पाहिजे. वैयक्तिक कौशल्य केव्हाही यश मिळविल्यावरच लक्षात येते. "

## खेळाचे तंत्र

यासाठी प्रत्येक खेळाडूनी तयारी व तन्दुरुस्ती याकडे शिक्षकाने लक्ष पाहिजे. आपण आपल्या थोर हॉकीपटू कै. ध्यानचंद, कै. बाबू, कै. किसनलाल वगैरे खेळाडूंच्या खेळांचे स्मरण तर ठेवले पाहिजेच, पण त्याचबरोबर आजच्या समानकालीन इतर देशांचे खेळाडू कसे खेळतात व काय तंत्र वापरतात याचाही अभ्यास केला पाहिजे.

काही वेळा सुरुवातीसुरुवातीलाच प्रतिपक्षावर जोरदार चढाई करून शक्य तितक्या लवकर गोल करणे हे फार महत्त्वाचे असते. त्यामुळे आपल्या खेळाडूंत एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण होतो आणि प्रतिपक्षाला साहजिकच बचावाचे पवित्रे उचलावे लागतात. पुष्कळदा मध्यम दर्जाचा संघ उत्तम संघावर मात करताना दिसतो. त्याचे कारण हेच की, त्या संघाने झटक्यात एक दोन गोलांची आघाडी मिळविलेली असते. पण त्याचबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, आघाडी मिळाली म्हणून जर पुढे सारखा बचावाचा खेळ चालू ठेवला तर तो अंगाशी येईल याची जाण ठेवून मधून-मधून चढाई करून शत्रुपक्षाला आपण गाफील अगर सुस्त झालो नाही याची जाणीव दिली पाहिजे. काही वेळा प्रतिपक्ष सुरुवातीला अगदी धीमेधीमे व बचावाचा पवित्रा घेऊन खेळत असतो. त्यात त्यांचा हेतू असतो की, विरुद्ध बाजू सारखी आक्रमता दाखवू लागली की, त्यांचा जोर व गती कमी होऊ लागेल आणि तसे झाले की, आपण त्याचा फायदा उठवू. हा त्यांचा हेतू लक्षात ठेवून प्रथम चढाई करणाऱ्या संघाने शेवट-

पर्यंत आपला दम टिकेल याचा अंदाज घेऊनच जलद व आक्रमक खेळाचे धोरण ठरविले पाहिजे.

आघाडीच्या खेळाडूंना कोणी व कसा कोपरा घ्यावा याची पूर्ण जाणीव असते. त्याचबरोबर जोरदार फटका मारण्यासाठी भरवशाचा अर्ध अगर पूर्णरक्षकालाही बोलावण्यात येते. पण ही जी हालचाल असते ती सगळी पूर्वनियोजित निर्णयावर अवलंबून असावी, नाही तर ऐनवेळी गोंधळ उडतो. आपल्याविरुद्ध जेव्हा कोपरा मारला जातो तेव्हा गोलरेषेवरील, गोलरक्षक व पूर्णरक्षक सोडून इतर तीन खेळाडूंनी विजेच्या गतीने फटका मारणाऱ्यावर तुटून पडून त्याला फटका मारणे असाध्य केले पाहिजे. याच वेळी गोलरक्षकाने एकदोन पावले गोलरेषा सोडून पुढे येऊन गोल रोखण्यासाठी सावध राहिले पाहिजे. अशा वेळी पूर्णरक्षकांनी शक्यतो चेंडू 'डी' मधून बाहेर जाईपर्यंत गोल खांबापाशीच राहून आलेला चेंडू रोखला पाहिजे. तसेच गोलरक्षकाने कोणत्याही वेळी कोणीही गोलरक्षकाच्या समोर अगर आड येऊ नये, कारण त्यामुळे त्याला चेंडू दिसणे अशक्य होते व गोल होणे शक्य होते.

## काही अनुभवाचे बोल

भारताचा एकेकाळचा संघनायक व सुप्रसिद्ध केंद्रमध्य बलवीरसिंग म्हणतो, "केंद्रमध्य हा केव्हाही निःस्वार्थी ( unselfish ) खेळाडू असणे जरूर आहे. अगदी तसाच बाका प्रसंग गुदरला तरच, नाहीतर त्याने मागे राहणे उपयोगी नाही. तो सतत पुढेच पाहिजे. हीच स्थिती बगलेच्या खेळाडूंची आहे. बगलेला असलेल्या खेळाडूंनी प्रसंगोपात्त मागे राहून आपल्या बचावाच्या फळीला मदत केली पाहिजे. चढाई हेच खरे बचावाचे धोरण आहे हे जाणूनच मी त्यावर जोर दिला होता."

भारताचा सुप्रसिद्ध कोच हरबेलसिंग याने म्हटले आहे की, "चेंडूवर ताबा मिळविणे, चेंडू जवळ न ठेवता तावडतोब गोलात मारणे, त्रिकोणात्मक पासेस व हाल-चाली आणि सतत आक्रमक धोरण या गोष्टी नेहमी लक्षात ठेवल्या पाहिजेत. सांघिक भावना व सांघिक डावपेचांनी होणाऱ्या प्रगतीला वैयक्तिक खेळ नेहमी खीळ घालणारा ठरतो हे महत्त्वाचे आहे हे प्रत्येक खेळाडूने ध्यानात ठेवले पाहिजे."

बचावात्मक पवित्रा घेताना या टोकापासून त्या टोकाकडे चेंडू मारला गेला तर प्रत्येक खेळाडूने आपली जागा लक्षात ठेवून कुणाला आणि कसे कव्हर करावयाचे याचे ध्यान ठेवले पाहिजे.

## संघनायक

पुष्कळदा संघाचे यश–अपयश संघनायकावर अवलंबून असते. उत्तम संघनायक कदाचित अगदी साधा खेळाडू असेल आणि त्याचप्रमाणे उत्तम खेळाडू असूनही तो संघनायक म्हणून कुचकामीही असू शकतो, म्हणून संघनायकाच्या अंगी तसे काही

विशेष गुण असणे जरूर असते.

शिस्तशीरपणा व शिस्त याचे त्याने पालन केले पाहिजे. पद्धतशीर खेळ कसा असावा याचे त्याने उदाहरण घालून दिले पाहिजे. निर्भीड, सडेतोड व स्पष्ट बोलणारा तो असला पाहिजे. संघातील खेळाडू, मग तो कितीही चांगला खेळाडू असो, त्याला त्याच्या चुका व दोष अगदी स्पष्ट शब्दांत पण समजून सांगताना त्याने कचरता उपयोगी नाही. आघाडीच्या ऐवजी पूर्णरक्षकाच्या जागी खेळणारा खेळाडू यशस्वी व चांगला संघनायक होऊ शकतो. याचे कारण त्याला त्याच्या जागेवरून खेळावर संपूर्ण नजर टाकता येते आणि म्हणून कोठे काय चुकते, काय कमी पडते व काय सुधारणा व्हायला पाहिजेत हे तो पाहू शकतो. भारताचा जागतिक कीर्तीचा गोलरक्षक शंकर लक्ष्मण हा देखील एक उत्तम संघनायक म्हणून गणला गेला होता. याचे कारणही हेच असले पाहिजे की, त्याला सर्वांच्या खेळाकडे नजर टाकता येत होती.

## प्रोत्साहन

प्रोत्साहनाचे दोनच शब्द संघाला फायदेशीर ठरतात. टाकून अगर छेडून बोलण्याने मने दुखावतात. सगळ्यांसमोर एखाद्याला टाकून न बोलता शांतपणे त्याची चूक समजावून सांगण्याने उपयोग होतो, हे संघनायकाने जाणले पाहिजे. संघ हा एखाद्या कुटुंबासारखा असतो व संघनायक, प्रत्यक्ष मैदानावर अगर बाहेरही त्याचा प्रमुख असतो. तेव्हा त्याने आपल्या वर्तनाने व वागणुकीने सगळ्यांच्या मनात आदर व प्रेम निर्माण केले पाहिजे. इतर खेळाडूंनीही त्याला सहकार्य दिले पाहिजे. दुसऱ्या कोणीही खेळाडूंनी जर त्याला सूचना केल्या तर त्याचा त्याने विचार करावा, सूचना करणाऱ्याला उडवून लावू नये.

खेळाच्या दृष्टीने जर कोठे ढिलाई अगर कमतरता वाटली तर लगेच त्याने जागांची अदलाबदल करून खेळाडूंना खेळविले पाहिजे. त्याने घेतलेल्या निर्णयावर जर कोणी काही टीका केली तर संघनायकाने आपल्या निर्णयाला न भिता व न रागावता चिकटून राहिले पाहिजे.

संघनायकाला महत्त्वाचे स्थान आहे आणि त्याची जबाबदारी पेलण्यात व यशस्वी होण्यातच त्याचे खरे कौशल्य आहे. फक्त ' ओली-सुकी ' केली की त्यांची जबाबदारी संपली हा समज अत्यंत चुकीचा आहे. संघनायकाने अमलात आणलेले धोरण व पवित्रा याला खूप महत्त्व आहे आणि त्यामुळेच पुष्कळदा संघाच्या यशापयशाचे पारडे फिरते.

संघनायक हा आपल्या खेळाडूंचा पुढारी असतो व मित्रही असतो. त्याने आपल्या सभ्य, सज्जन आणि निःस्वार्थीपणाच्या वागणुकीने सर्वांना उदाहरण घालून दिले पाहिजे. या दृष्टीनेच भारतीय हॉकी संघाचे सर्वश्री कै. ध्यानचंद, कै. पेंनीगर, कै. के. डी. सिंग ऊर्फ बाबू, कै. किसनलाल, शंकर लक्ष्मण, बलबीरसिंग वगैरेंनी संघनायक म्हणून आपली नावे अजरामर करून ठेवली आहेत.

## वैयक्तिक खेळ हा दुय्यम

संघ निवडताना प्रत्येक जागेसाठी योग्य व चांगलाच खेळाडू असला पाहिजे ही खबरदारी घेतली पाहिजे. म्हणजे याचा अर्थ असा नव्हे की, ज्याने त्याने आपल्या स्वतःच्या खेळापुरते पाहावे व आपले कौशल्य दाखवावे. प्रत्येकजण जर वैयक्तिक कौशल्यावर भर देऊन व्यक्तिमाहात्म्याचे स्तोम माजवू लागला तर त्यामुळे संघाचा घात होणार आहे हा धोका शिक्षकांनी व कोचीसनी वेळीच प्रत्येक खेळाडूच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कोणताही सामना सुरू करण्यापूर्वी आपण अमलात आणणाऱ्या डावपेचांची चर्चा सर्व खेळाडूंनी आपापसात केली पाहिजे व त्याप्रमाणे खेळ होतो की नाही याकडे संघनायकाने व शिक्षकांनी लक्ष देणे जरूर आहे. पण परिस्थिती-प्रमाणे जर थोडाबहुत बदल केला गेला तर त्याचेही महत्त्व लक्षात घेतले पाहिजे.

एकदा खेळ सुरू झाला म्हणजे आपले खेळाडू पंचांच्या शिट्टीप्रमाणे वागतात की नाही आणि पंचांच्या निर्णयावर प्रतिक्रिया अगर भाष्य करीत नाहीत ना? हे संघनायकाने पाहिले पाहिजे. चेंडू हातात असताना अगर अन्य वेळीही ओरडून एक-मेकांना सूचना देत नाहीत ना? याकडेही लक्ष दिले पाहिजे. कारण असे आरडाओरडा करणे हे सभ्यतेला धरून नाही व त्यामुळे गोंधळ होण्याचा संभव असतो. कोणत्या जागेला कोणता खेळाडू चांगला उपयोगाचा आहे अगर होईल याची जाणीव संघ-नायकाला असणे अत्यंत जरुरीचे आहे. त्याने आपल्या खेळाडूंना प्रोत्साहन दिले पाहिजे.

## संयम

आता जाता जाता काही महत्त्वाच्या गोष्टींकडे लक्ष देणे जरूर आहे. बचावाचे धोरण जरी अनुसरले असले तरी आघाडी कमकुवत व ढिली पडू देता उपयोगी नाही. हातात स्टिक असलेला खेळाडू जेव्हा रागावतो तेव्हा तो अत्यंत धोकादायक असतो. संघनायकाने स्वतःच्या रागाला प्रथम आवर घालून संघातील इतर खेळाडूंना संयमशील राखण्याचा प्रयत्न करणे अत्यंत महत्त्वाचे आहे. खिलाडू वृत्ती व सज्जनपणा दाख-विण्याची हीच खरी वेळ असते.

वर सांगितलेल्या सर्वच गोष्टी प्रत्यक्षात अमलात आणणे जरी शक्य होणार नसले तरी त्यावरून आपल्याला काही कल्पना मनात योजता येतील व त्या अनुषंगाने खेळात डावपेच लढविण्यास मदत होईल हाच हेतू इतके विस्तृत निवेदन करण्या-मागे आहे.

● ● ●

## प्रकरण ८

# खेळाडूंचे मानसशास्त्र

हॉकी संघात असलेल्या ११ खेळाडूंची स्थाने व त्यांच्या मर्यादा व जबाबदाऱ्या यासंबंधी आपण सविस्तर माहिती वाचली. आता हे खेळाडू आपापल्या जागांवर खेळत असतात त्या प्रत्येक जागेवर खेळणाऱ्या खेळाडूला कोणत्या व कशा परिस्थितीला तोंड द्यावे लागते व त्या दृष्टीने त्याचा मानसिक कल कसा असावा याबाबत आपण पाहू.

### गोलरक्षक

सुरुवात गोलरक्षकापासूनच करू या. गोलरक्षकाचे क्षेत्र मर्यादित असले तरी साऱ्या खेळाचे पारडे फिरण्याची मोठी जबाबदारी त्याच्यावरच असते.म्हणून गोलरक्षक केव्हाही शांत वृत्तीचा व परिस्थितीशी जुळतेमिळते घेणारा असावा लागतो. त्याला स्वतःच्या मनावर ताबा ठेवता आला पाहिजे. प्रतिस्पर्ध्यांचा सारखा दबाव येत असला तर त्याच्या मनाची बिलकूल गडबड होऊ देता उपयोगी नाही. संघातील इतर खेळाडू कितीही नामोहरम झाले असले तरी गोलरक्षकाने एकाकी शेवटपर्यंत खंबीर मनाने मुकाबला केला पाहिजे. प्रतिस्पर्धी संघ कितीही बलाढ्य असला तरी त्याबद्दल भीती बाळगून खचून जाता उपयोगी नाही. धीरगंभीरपणा, खंबीर मनोवृत्ती असलेल्याच खेळाडू या ठिकाणी यशस्वी होऊ शकतो. जरी एकदोन गोल झाले असले तरी हाय न खाता उभारी धरली पाहिजे. अशी ही गोलरक्षकाची मनोधारणा पाहिजे.

### पूर्णरक्षक

हे दोन खेळाडू म्हणजे संघाच्या बचाव फळीचे आधारस्तंभ आहेत. तेव्हा आपली जबाबदारी ओळखून वैयक्तिक खुमखुमी मनात न बाळगता, चिकाटीने कोणत्याही परिस्थितीत मुकाबला करण्यासाठी शांत डोक्याने खेळणाऱ्या मनोवृत्तीचाच खेळाडू या जागेला योग्य ठरतो. डावी काय अगर उजवी बाजू काय त्या दोघांची मानसिक धारणा वर नमूद केल्याप्रमाणेच असली पाहिजे. गोलरक्षक व अर्धरक्षक यांच्यातला हा दुवा असतो. तेव्हा त्या दोन्ही जागांवरील खेळाडूंशी सदैव सहकार्य करण्याची मनोवृत्ती त्याच्यात असणे फार महत्त्वाचे आहे. 'मी माझ्या जबाबदारीपुरते पाहीन' अशी विचारसरणी असणारा खेळाडू या ठिकाणी अडगळीसारखा ठरेल. धीरगंभीरपणा, शांत वृत्ती व मनमिळावूपणा या गोष्टींची तर या ठिकाणी अत्यंत जरुरी आहे. पूर्ण-रक्षकांनी स्वतःच्या मनाचा तोल जाऊ देता उपयोगी नाही. भीतीचा लवलेशही त्यांच्या

मनात असून चालणार नाही. तसेच त्याने केव्हाही हिंमत सोडायची नाही असा मनाचा पक्का निर्धार केला पाहिजे. प्रत्येक संकट अगर कठीण प्रसंगी त्याने आपले मनःस्वास्थ्य बिघडू देणे उपयोगी नाही. कारण शांत चित्ताने जो निर्णय तत्काळ घेऊन त्या दृष्टीने पाऊल टाकतो तोच खेळाडू बहुतेक वेळी यशस्वी होतो हे लक्षात ठेवले पाहिजे.

## अर्धरक्षक

ही फळी म्हणजे संघाचा कणा समजला जातो आणि त्यांतल्या त्यात मध्यार्धरक्षक म्हणजे तर मज्जारज्जूच. डाव्या व उजव्या अर्धरक्षकांना आपापल्या बाजूला लक्ष ठेवून, चढाई व बचावाचे धोरण स्वीकारावे लागते आणि यासाठी मनाची चलबिचल येथे चालत नाही. खंबीरवृत्तीचा व तत्काळ निर्णय घेईल अशी ज्याची मनोधारणा आहे असाच खेळाडू या जागेसाठी योग्य ठरेल. अर्धरक्षक खेळाडू हा तीक्ष्ण दृष्टी, शांत व धीम्या वृत्तीचा असून त्याच्या हालचालीत चपलता व निर्णयात योजकता पाहिजे. पूर्ण रक्षक व आघाडी या दोन जागांना सांधणारा तो घटक असतो. तेव्हा त्या दोन्ही फळ्यांच्या खेळाडूंबरोबर त्याला सतत संपर्क ठेवून मिळतेजुळते घ्यावे लागते आणि म्हणून तापट व गरम डोक्याचा खेळाडू येथे अयशस्वी होईल. त्याला सर्व मैदानभर लक्ष ठेवून चढाई अगर बचाव करावयाचा असतो म्हणून तडकाफडकी निर्णय व अचूक अंदाज घेण्यास लागणारी मनोवृत्ती असणाराच खेळाडू येथे उत्तम कामगिरी करू शकेल. इतक्या जबाबदारीची जागा आपण सांभाळतो याचा त्याला गर्व अगर ताठा असून चालणार नाही हे त्याने लक्षात ठेवले पाहिजे.

## आघाडी

चपलता व चढाई या गोष्टी अंगी असलेले खेळाडूच या जागेसाठी निवडले जातात. तेव्हा ते मनाने खंबीर, कचखाऊ वृत्ती नसलेले व केव्हाही नामोहरम न होता अखेरच्या क्षणापर्यंत जिद्द बाळगणारे असले पाहिजेत. खेळात विजय प्राप्त करून घेण्याची जबाबदारी आघाडीच्या खेळाडूंवर असल्याकारणाने त्यांना धडक मारून अगर प्रतिपक्षाच्या बाजूत एकदम घुसावे लागते आणि त्यामुळे पुष्कळदा त्यांना शारीरिक इजा वा जखमा होतात. पण तरीही त्यांनी संतापून न जाता आणि विचलित न होता शांत वृत्तीने खेळ चालू ठेवला पाहिजे. प्रतिपक्षातील खेळाडूंचे उट्टे काढीन, ठोशास ठोसा देऊन त्यांनाही जखमी करीन ही सूडाची भावना मनात बाळगून जर तो खेळ खेळला तर त्याचे व त्याबरोबर संघाचेही नुकसान होईल हा सारासार विचार त्याच्या मनात असलाच पाहिजे. यासाठी खंबीर मनोधैर्याचे व जिद्दीचे खेळाडू आघाडीवर यशस्वी होतात.

या सर्वांवरून आपण असा निष्कर्ष काढतो की, हा खेळ जिद्दीने खेळला पाहिजे हे जरी खरे असले तरी ती जिद्द म्हणजे आडदांडपणा, बेकायदेशीर वर्तन, रागाच्या

आहारी जाऊन सूड बुद्धीने वर्तन करणे हे नसून स्वतःचे कौशल्य व संघाची ताकद, शांतवृत्तीने पण ईर्ष्येने प्रतिपक्षाला जाणवून देऊन खेळावर ताबा ठेवणे हे आहे. यासाठी मनाने खंबीर, नामोहरम न होणारे धीराचे, रागावर काबू ठेवणाऱ्या मनोवृत्तीचेच खेळाडू संघात असणे अत्यंत जरुरीचे आहे.

वरीलप्रमाणे संघातील खेळाडूंच्या मनोवृत्ती कशा असाव्यात हे लक्षात ठेवून त्या दृष्टीने संघबांधणीचे काम केले पाहिजे. त्यासाठी मानसशास्त्राचा जास्त वापर करणे जरूर आहे. जिंकण्यासाठी सामना खेळला जातो. तेव्हा त्या ठिकाणी एकात्मतेची भावना जोपासली गेली पाहिजे. तसे करण्याची संधी प्रत्येक खेळाडूला उपलब्ध करून देणे जरूर असते. संघाची निवड होऊन खेळाडू जेव्हा एकत्र येतात, विशेषतः शिबिरात वास्तव्य करतात तेव्हा तेथील निवास, सहवास, खेळ, परस्परांतील स्नेहसंबंध या दृष्टि-कोणातून तज्ज्ञांनी निरीक्षण करून सहानुभूतियुक्त मार्गदर्शन केले पाहिजे. हार करण्या-साठी सुंदर मोती निवडले जातात व त्यांना एका सूत्राने बांधले म्हणजे सुंदर हार बनतो. त्याचप्रमाणे सुरेख, संघटित व बलाढ्य संघ बनण्यासाठी निवडक व लायक खेळाडूंना एका सूत्रात बांधणे हे तज्ज्ञांचे कार्य आहे.

● ● ●

प्रकरण ९

# आंतरराष्ट्रीय हॉकीत भारताची कामगिरी, सद्य:स्थिती व पुढे

ब्रिटिशांनी भारतात आपले पाय पसरविण्यास सुरुवात केली तेव्हापासून आस्ते आस्ते इंग्रजांची संख्याही येथे वाढत गेली. त्यामुळे साहजिकच त्यांचे खेळ, करमणुकीची साधने वगैरेदेखील इकडे आली. भारतीयांचा इंग्रजांशी जसजसा जास्ती संपर्क वाढत गेला व विशेषतः भारतीय लोक जास्त संख्येने सैन्यात दाखल होत गेले, तसतसे तेथे त्यांना सक्तीने काही खेळ खेळावे लागले. त्यांपैकी हॉकी हा एक होता. या खेळास भारतीयांना चांगली गोडी लागली व त्यांनी तो खेळ अगदी नवीन असूनही फारच थोड्या अवधीत आत्मसात केला, इतकेच नव्हे तर त्यावर प्रभुत्वही मिळविले.

सैन्यातील खेळाडू व त्यांच्याच जोडीला संस्थानिकांच्या नोकरीतले लोक यांच्यात सामने होऊ लागले आणि अशी वेळ आली की, आंतरराष्ट्रीय व जागतिक कीर्तीचे सामने म्हणजे ऑलिंपिकमधील हॉकीचे सामने होते. या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत भारताने १९२८ साली पदार्पण केले. येथे हे मुद्दाम नमूद केले पाहिजे की, ज्या वेळी भारताने ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत प्रथम पाऊल टाकले तेव्हापासून इंग्लंडने या हॉकी स्पर्धेतून अंग काढून घेतले, कारण भारतावर इंग्लिश लोक राज्य करीत होते तोपर्यंत भारताविरुद्ध खेळण्याचे इंग्लिश लोकांनी नाकारले होते. पुढे भारत स्वतंत्र झाल्यावर प्रथमच १९४८ साली खुद्द लंडनमध्ये झालेल्या ऑलिंपिक स्पर्धेत स्वतंत्र भारताच्या संघाने इंग्लिश संघाचा ४ विरुद्ध ० गोलनी पराभव केला. आणि या वर्षापासून भारताने हॉकी स्पर्धेत जागतिक कीर्ती मिळविण्यास सुरुवात केली ती पुढे सतत ३२ वर्षे टिकवून अजिंक्यपद राखले होते.

खरोखरच भारताने ही अपूर्व कामगिरी केली होती. सुरुवातीसुरुवातीला या खेळाकडे भारतीय लोक फारसे आकर्षले नव्हते. याचे उदाहरणच द्यावयाचे झाले तर, १९२८ साली प्रथमच ऑलिंपिक स्पर्धेत भाग घेणाऱ्या संघाची कुणी दखलही घेतली नाही, मग कौतुक तर बाजूलाच राहो! या संघाला निरोप देण्यासाठी मुंबई बंदरावर हॉकी फेडरेशनचे दोन सदस्य व एक पत्रकार इतकीच मंडळी हजर होती. पण भारताने ॲमस्टरडॅम येथील नवव्या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत अजिंक्यपद मिळवून सुवर्णपदक पटकाविले तेव्हा लोकांनी त्यांचे कौतुक केले आणि त्यानंतर पुढे या खेळाकडे लोकांचे जास्ती प्रमाणात लक्ष वेधू लागले. देशातल्या तरुणांना आपले कौशल्य दाखविण्याला ही

नवीन संधी आलेली आहे याची जाणीव होऊ लागली. ठिकठिकाणी हॉकी संघ स्थापन होऊ लागले व त्यांच्यात सामने होऊ लागले आणि अशा प्रकारे या खेळासंबंधी देशात नवीन चैतन्य निर्माण झाले. ॲमस्टरडॅम ऑलिंपिकनंतरच्या पुढील पाच ऑलिंपिक हॉकी स्पर्धांत भारताने आपले अजिंक्यपद टिकविले होते.

## गोल्सचा उच्चांक

या संदर्भात भारतीय संघ प्रत्येक वेळी कसा यशस्वी होत गेला हे पाहणे मनोरंजक ठरेल. पहिल्या प्रथमच ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत पदार्पण केलेल्या १९२८ साली ऑस्ट्रियाविरुद्ध ६–०, बेल्जियम विरुद्ध ९–०, डेन्मार्कविरुद्ध ५–०, स्वित्झरलंड विरुद्ध ६–०, हॉलंडविरुद्ध ३–० गोल्स, त्यानंतर १९३२ साली लॉस एंजिल्स येथील ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत जपान व अमेरिका या देशांशी झालेली लढत अगदीच पुळकी होती असे दिसून आले. कारण जपानला ११–१ ने तर अमेरिकेला २४–१ गोल्सने हरवून गोल्सचा उच्चांक करून ठेवला. अमेरिकेविरुद्धच्या २४ गोल्सपैकी कै. ध्यानचंद यांनी ८ गोल केले होते तर त्यांचे बंधू कै. रूपसिंह यांनी १० गोल्स मारले होते. १९३६ साली बर्लिन येथे झालेल्या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत भारताला एकूण ५ संघांशी सामने खेळावे लागले. या वेळी संघाचे नेतृत्व कै. ध्यानचंद यांच्याकडे होते. त्यांच्या 'जादुई' खेळामुळेच भारताने ही स्पर्धा जिंकली. त्यांची चपळाई, चेंडू टोलवून बाजूची फळी फोडण्याची पद्धत व हॉकीचा कौशल्य यामुळे प्रेक्षक थक्क होऊन गेले होते. त्यामुळेच प्रेक्षकांनी उत्स्फूर्तपणे 'हॉकीचे जादूगार' अशी पदवी त्यांना बहाल केली. या स्पर्धेत हंगेरीला ४–०, अमेरिकेला ७–०, जपानला ९–०, फ्रान्सला १०–० आणि जर्मनीला ८–१ गोल्सनी पराभूत केले होते. जर्मनी विरुद्धच्या सामन्यात कै. दारा यांचे ६ गोल होते. पुढे १९४० व १९४४ साली दुसऱ्या महायुद्धामुळे ऑलिंपिक स्पर्धा होऊ शकल्या नाहीत.

१९४७ साली हिंदुस्थानचे विभाजन झाल्याने काही खेळाडू पाकिस्तानमध्ये गेले तेव्हा १९४८ सालच्या लंडन ऑलिंपिक स्पर्धेत स्वतंत्र भारताचा हॉकी संघ उतरला. त्यात ऑस्ट्रिया ८–०, अर्जेंटिना ९–१, स्पेन २–०, हॉलंड २–० व मुख्य इंग्लंडला ४–० गोल्सनी पराभूत केले. यापूर्वी इंग्लंड भारताविरुद्ध (तेव्हाचे हिंदुस्थान) सामना खेळण्यास तयार नसायचे. पण याच वेळी लंडन येथे त्यांच्याच भूमीवर गाठ पडली आणि त्यात भारताने भरघोस यश मिळविले. हेलसिंकी येथे १९५२ ला सामने झाले त्यांत ऑस्ट्रेलिया, इंग्लंड व हॉलंड यांना अनुक्रमे ४–०, ३–१ व ६–१ गोल्सने हरविले होते. त्यानंतर १९५६ मध्ये मेलबोर्न येथे सामने झाले. त्या वेळी पाकिस्तानने या स्पर्धेत प्रथमच भाग घेतला. या वेळी अफगाणिस्तान १४–०, अमेरिका १६–०, सिंगापूर ६–०, जर्मनी १–० व पाकिस्तान १–० असे यश भारताने मिळविले.

वर वर्णन केलेला काळ हा ऑलिंपिक हॉकी स्पर्धेतील भारताचा गौरवाचा काळ

होता, पण त्यानंतर त्याच्या अजिक्यपदाला उतरती कळा लागली!

## उतरती कळा

भारताने १९६० साली रोम ऑलिंपिकमध्ये डेन्मार्क १०–०, हॉलंड ४–१, न्यूझीलंड ३–०, ऑस्ट्रेलिया १–०, जर्मनी १–० असे विजय मिळविले. पण अखेरच्या सामन्यात पाकिस्तानकडून भारताने हार खाल्ली आणि भारताचे हॉकीमधले सार्वभौमत्व नाहीसे झाले. एकदा पाय घसरू लागला की तो सावरणे कठीण होते. त्याप्रमाणे भारतीय हॉकीचे होत गेले असे दिसून येते!

पण १९६४ च्या टोकिओ ऑलिंपिक स्पर्धेत बेल्जियम २–०, हाँगकाँग ६–०, मलेशिया ३–१, कॅनडा ३–०, हॉलंड २–१, ऑस्ट्रेलिया ३–१ असे यश पुन्हा मिळविले. जर्मनी व स्पेनशी बरोबरी झाली आणि अखेरच्या सामन्यात पाकिस्तानला १–० ने हरविले आणि अजिक्यपद मिळविले. त्यामुळे पुन्हा आशेचे किरण दिसले, पण ते व्यर्थच ठरले! कारण त्यानंतर १९६८ च्या मेक्सिको ऑलिंपिकमध्ये पहिलाच सामना भारत न्यूझीलंडविरुद्ध १–२ ने हरला. पण त्यातून पुढे सावरून प. जर्मनीला २–१, मेक्सिको ८–०, स्पेन १–०, बेल्जियम २–१, जपान ५–०, पूर्व जर्मनी १–० असे जय मिळविले. पण उपान्त्य सामन्यात ऑस्ट्रेलियाने २–१ ने भारताचा पराभव केला. या स्पर्धेत पाकिस्तानला अजिक्यपद मिळून १ ला नंबर, ऑस्ट्रेलिया २ आणि भारत ३ ऱ्या क्रमावर आला.

१९७२ ला म्युनिच येथील ऑलिंपिकमध्ये भारत उपान्त्य सामन्यात पाकिस्तानकडून पराभूत झाला. पण नंतर हॉलंडवर २–१ असा जय मिळविला म्हणून ब्रॉन्झ पदकावर त्याला समाधान मानावे लागले. त्यानंतर मॉंट्रियल येथील १९७६ ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत भारतीय हॉकी संघाचा ५ वा नंबर लागला.

एककाळी अत्युच्च शिखरावर पोहोचलेला भारत अगदी खालच्या पातळीवर कसा गेला याची कारणमीमांसा वगैरेसंबंधी नंतर बघू या.

ऑलिंपिक हॉकी स्पर्धाव्यतिरिक्त भारताने इतर देशांत दौरे काढले होते व प्रत्येक ठिकाणी हॉकीतल्या कौशल्याबद्दल त्यांचा गौरवही होत होता.

## संस्मरणीय कामगिरी

भारतीय संघाने न्यूझीलंड व ऑस्ट्रेलियाचा १९३५ साली दौरा केला होता. हा संघ दौऱ्यासाठी मद्रासहून निघाला आणि न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया, सिलोन असा दौरा झाला. या वेळी कसलेही मैदान व हवामान असो, संघ सतत यशपताका फडकवीतच होता. आणि त्याने या दौऱ्यात अद्वितीय पराक्रम करून ठेवला आहे. एकूण ४८ सामने खेळले गेले ते सर्व जिंकले. न्यूझीलंडमध्ये २८ सामने झाले, त्यात एकूण ३१८ गोल्स नोंदविले गेले. न्यूझीलंडबरोबर झालेल्या तीन कसोटी सामन्यांतले यश असे होते.

पहिला कसोटी सामना ४ विरुद्ध २ गोल्स, दुसरा ३ विरुद्ध २ आणि तिसरा ७ विरुद्ध १. या ३१८ गोल्सपैकी २०१ गोल्स 'हॉकीचा जादूगार' कै. ध्यानचंद यांनी केले होते. या भरघोस यशानेच नव्हे तर आपल्या चांगल्या वागणुकीने व वर्तणुकीने न्यूझीलंडर्सची मने भारतीय संघाने जिंकून घेतली होती.

१९३६ च्या बर्लिन ऑलिंपिकमध्ये खेळलेल्या सामन्यात एकूण ३८ गोल्स भारताने केले. त्यापैकी कै. ध्यानचंद व कै. रूपसिंग या हॉकीवीरांनी प्रत्येकी ११ गोल्स केले होते. शेवटचा सामना जर्मनीशी झाला. ऑलिंपिक सामन्यापूर्वी सरावाच्या एका सामन्यात जर्मनीने भारताला ४ विरुद्ध १ गोल्सने हरविले होते. त्यामुळे संघ अधिक बळकट व्हावा म्हणून सुप्रसिद्ध हॉकीपटू पिनिगर यांना बोलावण्यात आले, पण ते न आल्यामुळे आयत्या वेळी दारा हा खेळाडू आला. तो शेवटचा जर्मनी विरुद्धचा सामना खेळला व त्याने जर्मनीविरुद्ध एकूण ६ गोल केले व तो सामना ८–१ असा जिंकला.

## गौरवोद्‌गार

१९३६ च्या बर्लिन ऑलिंपिकच्या वेळचा भारतीय हॉकी संघाचा खेळ पाहून तिकडचे लोक इतके वेडे झाले होते की, संघावर स्तुतिसुमनांचा वर्षावच करीत होते. एका इच पत्रकाराने भारतीय खेळ व खेळाडूंचे वर्णन केले होते.

"भारतीय खेळाडूंकडे वरून पाहिले तर ते आदरणीय व अगदी साधे दिसतात, पण पायांकडे लक्ष गेले तर जणू ते पोलादीच आहेत की काय असे वाटते. ते खेळतात तेव्हा त्यांची दंडिका जणू काटा, चमचा किंवा सुरीसारखी केव्हा भक्ष्य येते यासाठी तयारीने असते. जेव्हा खेळ सुरू होण्याची शिट्टी होते तेव्हा ते चेंडू दंडिकेवर इतक्या सहजतेने घेतात की, चेंडू एखाद्या स्त्रीच्या हातातील टोपलीत व्यवस्थित असावा इतका. पण चेंडू घेऊन ते जेव्हा दौडतात तेव्हा जणू एक्सप्रेस ट्रेन जावी अशी त्यांची गती असते, पण चेंडू मात्र अगदी बिनधास्त त्यांच्या दंडिकेच्या टोकाशीच असतो. 'बुली' केल्यानंतर १०० पैकी ९९ वेळा त्यांची दंडिका प्रथम चेंडूवर ताबा मिळविते आणि दुसऱ्याच क्षणी चेंडू दूरवर फेकला जातो. पण त्याच्या मागे कोणीतरी खेळाडू असतोच आणि जणू एखादी लवचिक जादूची कांडी असावी तसं दंडिकेने चेंडू सहज आपल्याकडे ओढतो, तेव्हा असे वाटते की हा हॉकीचा खेळ नसून हातचलाखीचाच खेळ आहे.

"मध्यंतराच्या वेळी युरोपिअन खेळाडू विश्रांतिगृहात जाऊन लोळतात, आपले गुडघे व इतर अवयवांना मसाज करून घेत असतात. परंतु भारतीय खेळाडू मैदानावरच उभे राहून गप्पा मारीत, आपल्या लवचीक हातातील दंडिकेशी चाळे करीत, पाण्याने चुळा भरीत, तोंड–हात धुत व मधून मधून लिंबाच्या फोडी चोखीत असताना दिसतात. किती हा विरोधाभास!"

जपान्यांना तर भारतीय खेळाडूंच्या हातातील दंडिका म्हणजे जादूची काठी असावी असे वाटे!

याव्यतिरिक्त आफ्रिका, युरोप, मलेशिया वगैरे देशांतही असेच भारतीय संघानें दौरे काढले होते व त्यांतही त्याने उत्तम यश व लौकिक संपादन केला होता.

## खेळात राजकारण !

पण १९६० च्या नंतर आस्ते आस्ते भारताची पीछेहाट होत गेली हे स्पष्ट आहे. भारत ऑलिंपिक व आंतरराष्ट्रीय स्पर्धांत भाग घेऊ लागला त्या वेळी साहजिकच त्यात भाग घेऊन काही तरी करून दाखवू अशी इच्छा मनात ठेवून खेळाडू स्पर्धेत उतरत. त्या वेळी त्यांच्यात उत्सुकता, ईर्षा, जिद्द व राष्ट्रीय भावना जागृत होती. खेळाचा दर्जा, कुवत, अंगचे कौशल्य यावरूनच सांघिक खेळासाठी खेळाडूंची निवड होई. परंतु जसजसे आपण धवघवीत यश मिळवीत गेलो तसतसे स्पर्धा व खेळाडूंची निवड याबाबत वशिलेबाजी, प्रांतीय दृष्टिकोण व परदेशांत केवळ मजा मारण्यास कसे जाता येई या दृष्टिकोणातून पाहण्यात येऊ लागले आणि त्यासाठी स्वार्थी व वाणेरडे राजकारण त्यात घुसल्यामुळे यशाला व खेळाच्या दर्जाला ओहोटी लागली.

## घसरगुंडीची कारणमीमांसा

आपण यशापासून दूर का जात आहोत ? यासंबंधीची कारणमीमांसा व त्यात कशी व काय सुधारणा करणे जरूर आहे याकडे वळू.

भारताला सतत यश मिळू लागल्याने सगळेजण जास्त शेफारून गेले व खेळाडूंना अवास्तव डोक्यावर घेऊन बसू लागले आणि त्यामुळे गाफिलपणा भरपूर आला. इतर देश याच वेळी सतत सराव करीत नवीन नवीन गोष्टी आत्मसात करण्यात गुंतले होते. त्याचे प्रत्यंतर म्हणजे ऑलिंपिक व आंतरराष्ट्रीय हॉकी स्पर्धांतून ते दाखवू लागलेली चढाई आणि पराभव झाला तरी गोलसची संख्या केवळ १ किंवा २ चीच राहू लागली. पण भारत मात्र आपल्या खेळात वगैरे कोणतीही सुधारणा न करता आणि दुसरे देश काय करीत आहेत याकडे लक्षही न देता आपण अजिंक्य या घमेंडीतच राहिला. हॉकी खेळाच्या नियमांत जेव्हा बदल होण्याचे बोलले जात होते त्या वेळी देखील आपण जागरूक राहिलो नाही. पण जेव्हा हे नियम प्रत्यक्षात अमलात आणले गेले तेव्हा उगाच आरडाओरडा सुरू केला. पण ' बैल गेला नि झोपा केला ' अशी स्थिती झाली !

आपली चाललेली घसरगुंडी पाहून कै. ध्यानचंद, कै. के. डी. सिंग ऊर्फ 'बाबू' वगैरेंना अत्यंत दुःख होत होते. ते आपल्याकडून खेळाडूंना व शिक्षकांना प्रशिक्षण सूचना देत होते. परंतु त्यांच्याकडे तसे कुणी लक्षच दिले नाही. असे म्हणतात, ' कै. के. डी. सिंग ऊर्फ ' बाबू ' याला या आपल्या अधोगतीचा धसका सहन न होऊनच त्याने आत्महत्या केली ! '

रोम व मेक्सिको येथील ऑलिंपिकमध्ये भारताने हार खाल्ली त्याचे मुख्य कारण खेळात शिथिलता आणि कमकुवतपणा आला हे खरे आहे. तसेच ' पर्थ ' येथे भारताने

जे आपल्या खेळाचे हसे करून घतले व पाचवे स्थान मिळविले या नामुष्कीबाबत कुणालाच खंत वाटत नाही. हॉकी फेडरेशनचे त्या वेळचे अध्यक्ष तर या स्थानावरही समाधानी होते! याला काय म्हणावे! या पराभवावरून भारताला धडाडीची अत्यंत जरूर आहे याबद्दल कोणाचेही दुमत होणार नाही.

## अवास्तव कौतुक

भारतात विजयाचे फारच कौतुक होते असे मागे म्हटले आहे. त्या दृष्टीने इतर राष्ट्रांतले एकच उदाहरण पाहा. पाकिस्तानबरोबर 'पर्थ' येथे ऑस्ट्रेलियाने जोरदार लढत दिली. याबद्दल सगळे जण ऑस्ट्रेलियन संघाचे कौतुक करीत होते, पण त्या संघाचा नायक चार्लस् बर्थ म्हणतो, "आम्ही पाकिस्तानबरोबर आणखी जोरदार टक्कर दिली असती व प्रयत्न केले असते तर आम्हाला यश मिळणे कठीण नव्हते. आम्ही जिंकू असा आमच्या खेळाडूंचा आत्मविश्वास होता, पण आम्ही थोडे कमी पडलो. आता त्या दृष्टीने आम्ही तयारी केली पाहिजे." हे उद्‌गार कोणीकडे आणि जो देश सहा वेळा ऑलिंपिकमध्ये जगज्जेता झाला होता त्याच्या एका जबाबदार व्यक्तीने केवळ पाचव्या स्थानावर समाधान मानावे यापेक्षा आणखी नामुष्कीची कोणती गोष्ट असू शकेल?

भारताची हॉकीत पीछेहाट होण्याचे आणखी एक कारण सांगितले जाते ते हे की बचावाची फळी विधायक दृष्टिकोणातून खेळाकडे न पाहता विघातक धोरण ठेवूनच खेळू लागल्याने खेळाची शान, त्यातील प्रभुत्व व कौशल्य लोप पावू लागले. या म्हणण्यात बरेच तथ्य आहे म्हणून तिकडे जास्त लक्ष देणे जरूर आहे.

जेव्हा ही स्थिती बदलावयाची असेल तर प्रथम आपल्या दृष्टिकोणात आमूलाग्र बदल झालाच पाहिजे हे अत्यंत महत्त्वाचे आहे. गेलेली इभ्रत मिळविण्यासाठी प्रसंगी प्राण पणाला लावून खेळण्याची जिद्द व ईर्षा प्रत्येक खेळाडूच्या हृदयात असली पाहिजे. युद्धपातळीवर (War Footing) या हॉकीच्या प्रश्नाकडे लक्ष दिले पाहिजे, आणि त्या दृष्टीने मुकाबला करण्याची तयारी पाहिजे. आपल्याला दुसरे कोणतेही स्थान मिळाले तर त्यात आपली नामुष्की आहे ही जाण प्रत्येकाला असली पाहिजे.

आपली मुख्य अडचण ही आहे की, आपला हॉकीचा खेळ चांगला होत नाही, दर्जा खालावला आहे, ही सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट असलेली वस्तुस्थिती, खेळाडू, त्यांना शिक्षण देणारे शिक्षक व हाताळणारे अधिकारी व इतर मान्यवर मंडळी हे मान्य करायला तयारच नाहीत! आंतरराष्ट्रीय, जागतिक व इतर स्पर्धांतून अलीकडे आपण काय दिवे लावीत आलो आहोत यावरून आपल्या खेळाचा दर्जा खाली गेलेला आहे हे अगदी स्पष्ट आहे, तरीही काही मंडळींना आशा वाटते! १९७५ सालच्या क्वालालंपूर येथे झालेल्या तिसऱ्या विश्वचषकाच्या वेळेला अपेक्षेपेक्षाही वेगळे चित्र दिसले. तसेच पुन्हा आपणाला दिसेल, ही आशा करीत बसणे हा शुद्ध वेडेपणा आहे, कारण या आशेच्या

जोडीला अविश्रांत प्रयत्नही लागतात, हे ही मंडळी विसरतात हे मोठे आश्चर्य आहे !

## पराभवाची कारणे

'पर्थ 'च्या सामन्याच्या वेळेला भारताचा संघनायक असलेला अशोककुमार सामन्याचे पूर्वी म्हणाला होता," आतापर्यंत आपण जे सरावाचे सामने खेळलो त्यावरून असे वाटते की, ही स्पर्धा आपण जिंकू ". पण प्रत्यक्षात काय पदरात पडले ? पाचवे स्थान ! अशोककुमारने आणखी एके ठिकाणी म्हटले आहे की, " खेळाडूंची निवड-पद्धती चुकीची आहे हेही आपल्या खेळाचा दर्जा घसरण्याला एक कारण आहे. " तो पुढे म्हणतो, " नवीन व ताज्या दमाचे व रक्ताचे खेळाडू असलेल्यांचा संघ निवडताना पाकिस्तानप्रमाणे काही अनुभवी खेळाडू संघात असणे अत्यंत जरुरीचे आहे, तसेच जुना एक खेळाडू निवृत्त होत असला तर ती जागा भरून काढण्यासाठी दुसऱ्या एका तरुण व त्या जागेला योग्य आणि लायक खेळाडूला तयार केले पाहिजे. हल्लीच्या निवड-पद्धतीमुळे अनुभवी तसेच नवीन खेळाडूला देखील आपल्या निवडीबद्दल पूर्ण शाश्वती नसते ! "

फाळणीपूर्वी भारताचे प्रतिनिधित्व केलेला व १९५२ आणि ६० पर्यंतच्या ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत पाकिस्तानकडून खेळलेला प्रसिद्ध हॉकीपटू लतिफ-उर-रहेमान याने भारताचा कराची येथील कृत्रिम हिरवळीवर झालेला खेळ पाहून असे म्हटले होते की, " कृत्रिम हिरवळीवर खेळण्यासाठी निवड करताना तीस वर्षांहून अधिक वयाचे खेळाडू पाठविणे हे शुद्ध वेडेपणाचे आहे. कृत्रिम हिरवळीवर खळताना शारीरिक तन्दुरुस्ती आणि वेग यांना विशेष महत्त्व असते. म्हणूनच पाकिस्तानबरोबर खेळताना भारतीय संघ पूर्वार्धातच संपूर्ण कोसळला होता. " लतिफ यांच्या उद्‌गारांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

काही वेळा सुरुवातीपासूनच जास्त जोरदार व बलाढ्य संघाशी मुकाबला करावा लागला हेही आपल्या पराभवाचे एक हास्यास्पद व पोरकट कारण पुढे केले जाते. क्रिकेटमध्येही हल्ली वेगवान व उसळीच्या गोलंदाजीबाबत जसे भागूबाईसारखे रडगाणे चालू आहे त्यातलाच हा प्रकार आहे !

## फुशारकी व भ्रम

इतर राष्ट्रे आपला दर्जा वाढविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत आणि भारत ? ' एकवेळ सार्वभौम ' होतो याच फुशारकीत राहून प्रयत्नात शिथिल झाला आहे. पंचांचे निर्णय व त्यांच्या कार्यक्षमतेवर टीका करून पराभवातून पळ काढण्याचा काहीजण प्रयत्न करतात. जगातला एक बलाढ्य व मातब्बर असा आपला संघ अजूनही आहे, हा भ्रामक समज उराशी बाळगून आपण आंधळ्याप्रमाणे वावरत आहोत. पण खरी परिस्थिती तशी नाही ! व्यवस्थापक व शिक्षक, " खेळाडूंना किती बजावले,

सांगितलं, शिकवलं तरीही ते आक्रमक खेळ खेळत नाहीत, बचावाच्या शैली चढाईचे धोरण स्वीकारतात " असले समर्थन करून आपली कातडी बचावू पाहतात. म्हणजेच खेळाडू व शिक्षक यांच्यात समन्वय व एकोपा नाही आणि शिस्तीचा तर पूर्ण अभाव हेही आपल्या घसरगुंडीला एक मुख्य कारण आहे हे स्पष्ट होते आणि याकडे फारच गंभीरतेने पाहिले पाहिजे.

## वैयक्तिक खेळ

सरावाचा असो अगर स्पर्धेतल्या कोणत्याही सामन्याकडे पाहताना ' प्रतिस्पर्ध्यांवर मात ' हे उद्दिष्ट डोळ्यांपुढे असले पाहिजे व तसे सांघिक प्रयत्न झाले पाहिजेत. हल्ली कोणताही सामना पाहताना एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की प्रत्येकजण, एखादादुसरा अपवाद सोडून, चेंडू पुढे अगर आपल्या खेळाडूकडे ताबडतोब कधीच देत नाही. वैयक्तिक कौशल्य ( Gallery Game ) दाखविण्यात प्रत्येकजण गर्क असतो. जेव्हा त्याच्यावर चढाई होते अगर चेंडूचा ताबा जाईल असे वाटते, तेव्हाच तो चेंडू दुसऱ्या-कडे ढकलतो. ' ढकलतो ' असे मुद्दामच म्हणावे लागते, कारण चेंडू जोराने मारला जातच नाही ! त्यामुळे तो आपल्या खेळाडूला न मिळता प्रतिस्पर्ध्यांच्या हाती जातो व तो त्याचा फायदा उठवितो. हा आपला कमकुवतपणा इतर संघांनी बरोबर हेरला आहे. इतर राष्ट्रे या बारीक-सारीक गोष्टींवर चांगलाच भर देऊन आपल्या खेळात सुधारणा करण्याचा प्रयत्न करतात.

हल्लीच्या खेळाची पद्धतच पूर्णपणे बदलली असली तरीही पूर्वीप्रमाणेच आपण ' फिल्ड गोल्स ' करण्याच्या प्रयत्नात असलेच पाहिजे व त्याचबरोबर दंडकोपरे व दंडफटके यांची परिणती गोलमध्ये रूपांतर करण्यात जास्त प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे. पाकिस्तानने याबाबत जुने व नवे असे दोन्ही खेळांचे तंत्र अवलंबिलेले आहे, त्याकडे लक्ष देणे जरूर आहे. तसेच वैयक्तिक खेळापेक्षा सांघिक खेळावरच लक्ष केंद्रित करणे हे फार महत्त्वाचे आहे.

## निःपक्षपाती निवड व शिस्त

खेळाडूंची निवड करताना ' आडातच नसेल तर पोहऱ्यात कोठून येणार ' याचे भान ठेवले पाहिजे. एकदा निवड झाली की, मग त्या खेळाडूंना शिक्षण देण्यासाठी वेळ, श्रम व साधने यासाठी योग्य तो खर्च केला तर तो अनाठायी होणार नाही. अमक्या-तमक्याचा नातलग आहे, कोणाच्या तरी वशिल्याने आला आहे, अमूक प्रांताचा, अमूक जातीचा असल्या गोष्टींना निवडीच्या वेळीच फाटा दिला पाहिजे. खेळाला लागणारे गुण व क्षमता आणि संघाला त्याचा किती उपयोग होईल या दृष्टिकोणातूनच निःपक्ष-पातीपणे खेळाडूंची निवड झाली पाहिजे. खेळाडूंच्या मनावर शिस्तीचे महत्त्व बिंबविले पाहिजे व ते प्रत्यक्षात काटेकोरपणे अमलात आणले पाहिजे. ज्या खेळाडूकडून बेशिस्त

वर्तन झाले असेल, मग तो कितीही चांगला व उपयुक्त खेळाडू असला तरी त्याची गय करून चालणार नाही. कारण नवीन खेळाडूंवर त्याचा परिणाम होतो. खेळाडूंच्या मनात शिकण्याची खरी इच्छा आहे व ते त्यात रस घेत आहेत तेव्हाच त्यांना शिक्षण दिले तरच त्याचा उपयोग होतो. एकदा का त्यांच्या कानात वारे शिरले की ते नवीन गोष्टी शिकणे अगर आपल्या खेळात सुधारणा करणे कठीण असते.

## राष्ट्रीय भावना

भारत देश एवढा मोठा असूनही आपणाला जगाला भारी होतील असे पूर्वीसारखे १५ खेळाडू तयार करणे कठीण वाटावे यापेक्षा दुर्दैवाची व नामुष्कीची गोष्ट कोणती ? ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, हॉलंड, जर्मनी वगैरे देशांची उदाहरणे आपण डोळ्यांपुढे ठेवली पाहिजेत. इतर राष्ट्रे राष्ट्रीय भावनेने खेळाकडे पाहतात. यासाठी खेळात कोणत्याही तऱ्हेचे राजकारण येता उपयोगी नाही. तसेच ज्यांना खेळात आस्था, चिकाटी आहे, मेहनत करण्याची तयारी आहे, जिद्द आहे असे निःस्वार्थ दृष्टीने आणि राष्ट्रीय भावनेने खेळ खेळून राष्ट्राची इभ्रत राखण्याची जाज्वल्य तळमळ खेळाडूंच्या व अधिकाऱ्यांच्या मनात असेल तरच आपण हॉकीतले आपले पूर्वीचे अजिंक्यपद पुन्हा मिळवू शकू !

तेव्हा परदेशात आणि विशेषतः ऑलिंपिक अगर विश्वचषकसारख्या स्पर्धांना जाणाऱ्यांनी एक गोष्ट कटाक्षाने लक्षात ठेवली पाहिजे की, आपण खेळासाठी आपल्या देशाचे प्रतिनिधित्व करीत आहोत. केवळ सहल, चैन, खाणेपिणे यासाठी दौऱ्यावर जात नाही. आपल्या वागणुकीकडे व खेळाकडे सर्व जगाचे लक्ष आहे. तेव्हा आपल्यामुळे देशाची अब्रू जाणार नाही तर ती सुरक्षित राहील याची प्रत्येकाने जाणीव ठेवली पाहिजे.

हॉकीचे प्राचार्य समजले जाणारे स्वामी जगन्नाथ यांच्या मते– " पुष्कळ ठिकाणी खेळण्याला मोकळी जागा कमी पडते व पावसाचा व्यत्ययही बराच येतो. त्यामुळे खेळाकडे दुर्लक्ष होते. न्यूझीलंडमध्ये ज्या मैदानावर रग्बीचे सामने झाले तेथेच नंतर हॉकीचे झाले. तेव्हा रग्बीचा सामना पाहिलेला एक डॉक्टर भारताचा हाकीचा खेळ पाहून इतका खूप झाला आणि म्हणाला, ' या खेळातील चपळाई, लालित्य व झोक पाहून, रग्बीचा खेळ हा किती रानटी प्रकारचा आहे असे वाटते. ' त्याच्या म्हणण्यात बरेच तथ्य आहे. हॉकीत लवचिक व हलक्या शरीराचे खेळाडू लवकर चमकतात आणि अशा खेळाडूंची आपल्याकडे वाण नाही. म्हणून शासनाने इकडे लक्ष देऊन शाळेपासूनच हॉकी हा खेळ सक्तीचा केला पाहिजे. कारण हॉकी हे आमच्या राष्ट्राचे भूषण आहे व ते टिकविणे हे आपले कर्तव्य आहे ! "

स्वामी जगन्नाथांनी म्हटल्याप्रमाणे शाळाचालकांनीच नव्हे तर पालकांनीदेखील खेळ, खेळाची आवड व त्याचे महत्त्व समजावून घेऊन ते विद्यार्थ्यांवर बिंबवून त्यांना खेळाला प्रवृत्त केले पाहिजे. या खेळाची जोपासना व वृद्धी होण्यासाठी शासन, उद्योगपती व निरनिराळ्या संस्था यांनी पुढाकार घेऊन खेळाडूंना प्रोत्साहन व साहाय्य दिले तरच आपला खेळाचा दर्जा सुधारू शकेल.

वरील सर्व विवेचनानंतर शेवटी असे सुचवावेसे वाटते की, पुढील गोष्टींकडे जास्त लक्ष दिल्यास आपणाला भविष्य काळात चांगले यश मिळविता येईल.

**क्रीडांगणे**

बदलत्या परिस्थितीत पूर्वीसारखी टणक क्रीडांगणे आता राहिलेली नसून आता ' ॲस्ट्रो टर्फ ' ( Astro Turf ) किंवा पॉलीग्रास ( Polygrass ) ह्याच क्रीडांगणांवर सराव करणे अत्यंत जरूर आहे. ' ॲस्ट्रो टर्फ ' मैदानावर पश्चिम जर्मनी, हॉलंड, इंग्लंड, ऑस्ट्रेलिया वगैरेंना चांगला सराव आहे. रशिया, पोलंड, वगैरे राष्ट्रे पॉलीग्रासवर सराव करतात.

कृत्रिम हिरवळीवर ( Astro किंवा Polygrass ) खेळ जलद होतो. त्यामुळे आपल्या खेळाडूंची दमछाक होते आणि म्हणून खेळाडूंची शारीरिक क्षमता कमी पडते. अलीकडील भारतीय संघाच्या खेळाचे पुनरावलोकन केले असता असे आढळते की, भारतीय संघ पूर्वार्धात जलद खेळून गोल चढवितो व उत्तरार्धात केवळ बचावात्मक खेळ खेळतो, कारण चढावयुक्त खेळ शारीरिक अक्षमतेमुळे त्यांना जमत नाही, म्हणून कृत्रिम हिरवळीच्या मदानावर सराव होणे अत्यंत आवश्यक आहे. पण दुर्दैवाने आपल्या देशात कृत्रिम हिरवळीने बनविलेले एकही क्रीडांगण नाही, कारण त्यासाठी फार पैसा लागतो ही सबब हास्यास्पद आहे. तेव्हा इतर गोष्टींवरील अनाठायी, अनावश्यक व अवांतर खर्च कमी करून शासनाने देशात ॲस्ट्रो अगर पॉलीग्रासची मैदाने तावडतोब तयार करून घेतली पाहिजेत. तसेच यासाठी केवळ शासनावरच अवलंबून न राहता देशातील क्रीडाप्रेमी संस्था, धनिक, उद्योगपती व खेळाडू यांनी यात जातीने लक्ष घातले पाहिजे.

**बूट :** वरील तऱ्हेच्या क्रीडांगणांवर सराव करण्यासाठी त्याला योग्य असेच ' बूट ' वापरण्याचा प्रत्येक खेळाडूने निश्चय केला पाहिजे.

**स्टिक ( दंडिका ) :** ही क्रीडांगणे फार फास्ट ( जलद ) असल्याकारणाने बचावफळीच्या खेळाडूंनी अधिक वजनाच्या, पण नियमात बसणाऱ्या, स्टिक्स (दंडिका) वापरणे हितावह होईल.

**रचनापद्धती :** परंपरागत अशी १–२–३–५ ही खेळाडूंची रचनापद्धत जरी आपल्याला सोयीस्कर वाटत असली तरी इतर राष्ट्रे बचावफळी मजबूत करण्याकडे जास्त भर देत आहेत आणि कृत्रिम गवती मैदानावर तर ते अत्यावश्यक आहे असा अनुभव येतो. म्हणून त्या दृष्टीनेही आपण रचनापद्धतीत बदल करणे जरूर आहे. मग ती १–३–३–४ अशी असो अगर १–१–२–३–४ अशी असो. पण जी पद्धत आपल्याला फायदेशीर होईल तिचा सराव व्यवस्थितपणे करणे हितावह ठरेल.

**खेळाचे तंत्र**

' फिल्ड गोल ' झाले तर ते चांगलेच. पण दिवसेंदिवस ते करणे फारच कठीण होत आहे. कारण वैयक्तिक कौशल्य व जबाबदारीचा खेळ, प्रतिस्पर्ध्यांच्या बचावापुढे

कठीण होऊन बसले आहे. त्यासाठी कॉर्नर ( कोपरा ) अगर 'पेनल्टी कॉर्नर' ( दंड-कॉर्नर )चा फटका अचूकपणे मारण्याचा सराव करून त्यात आपण निष्णात बनले पाहिजे. या दृष्टीने हॉलंड व पश्चिम जर्मनीच्या खेळाडूंनी खूपच मेहनत घेतलेली आहे. तसेच चढाईचा खेळ आक्रमक करण्यासाठी चेंडू आडविणे, प्रतिपक्षाला चकविण्याच्या चाली रचून योग्य अशी संधी मिळविणे, गोलार्ध वर्तुळात अचूकपणा ठेवणे आणि परतीचा फटका ( Rebound ) मारण्याची संधी निमिषार्धात साधणे वगैरे गोष्टी पूर्ण आत्मसात केल्या पाहिजेत. या दृष्टीने पाकिस्तानच्या खेळाडूंचे उदाहरण डोळ्यां-समोर ठेवले पाहिजे.

**निवड**

खेळाडूंची निवड करताना त्यात बाणेरडे राजकारण कटाक्षाने टाळले पाहिजे. त्यासाठी उत्कृष्ट असे दूरगामी नियोजन व त्याची निःसंदिग्धपणे कार्यवाही केली पाहिजे.

शाळा-कॉलेजांमध्ये हॉकीला प्रोत्साहन देऊन त्यांच्यात सतत स्पर्धा ठेवल्या पाहिजेत व उत्तम खेळाडूंचा सतत पुरवठा कसा होईल या दृष्टीने योजना केली पाहिजे. त्यासाठी राष्ट्रीय स्तरावर वयोगटांच्या हॉकीस्पर्धा घेतल्या पाहिजेत; आणि म्हणून या-साठी १६ वर्षांखालील, १८ वर्षांखालील, २१ वर्षांखालील व अनुभवी खेळाडू असे गट तयार करावेत. या सर्वांकरिता एकच निवड समिती असावी. कारण त्यामुळे कोणत्या वयोगटातील कोणता खेळाडू, राष्ट्रीय संघ बनविताना कोणत्या जागी खेळ-ण्यास योग्य ठरेल ह्याचा निवड समितीला अंदाज येऊ शकेल.

ही निवड केव्हाही प्रांतिक, भाषिक अथवा इतर अवांतर निकष लावून न घेता केवळ गुणवत्तेवर, ज्या जागेसाठी खेळाडू निवडावयाचा त्याचसाठी केली पाहिजे. तरुण वयोगटाचे सामने अनुभवी गटाबरोबर ठेवले पाहिजेत. कारण त्यामुळे एका संघामधून दुसऱ्या संघात खेळाडू स्वतःच्या खेळाच्या कौशल्यावर सहसजासहजी जाऊ शकेल, तेथे वय आड येणार नाही आणि त्यामुळे त्याचा खेळ निर्भयपणे व दबावरहित होऊ शकेल.

**सराव**

सर्व खेळाडूंना प्रशिक्षण देऊन त्यांच्याकडून सतत व पद्धतशीर सराव करून घेण्या-साठी कसलेले शिक्षक, कोच व मॅनेजर असणे जरुरीचे आहे. खेळाडूत सांघिक भावना सतत जोपासली गेली पाहिजे. यासाठी जरूर वाटल्यास व्यासंगी, अनुभवी असे परदेशी शिक्षक आणावे लागले तरी चालेल पण ही राष्ट्रीय प्रशिक्षण-शिक्षक अगर कोच म्हणून जी नेमणूक करावयाची ती कमीत कमी चार वर्षांची तरी असणे जरूर आहे, कारण त्यामुळे या शिक्षकांना व्यवस्थित मार्गदर्शन करणे सोईचे होईल.

म्हणून आपल्या हॉकी खेळाच्या संघटनेचे पुनरुज्जीवन व्हावयास हवे. त्यासाठी संघटनेची रचना व कार्यपद्धती संपूर्णपणे बदलून ती दीर्घकालीन दूरदृष्टी ठेवूनच आखली गेली तरच भारताला हॉकी क्षेत्रात गमावलेले नाव परत मिळविता येईल.

● ● ●

## प्रकरण १०

# ऑलिंपिक हॉकी सामन्यांचा आढावा

गेल्या प्रकरणात ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत भारताने केलेल्या कामगिरीसंबंधी बरेच काही आपण पाहिले. त्या अनुषंगाने ऑलिंपिक खेळात हॉकीचा समावेश केव्हापासून झाला व त्यात कशी प्रगती होत गेली, निरनिराळी राष्ट्रे या खेळात कसा रस घेऊ लागली यांसंबंधीचा आढावा घेतला तर तोही मनोरंजकच आहे.

ऑलिंपिक खेळांची तशी पद्धतशीर सुरुवात १८९६ साली झाली असली तरी त्यात पुढे पुढे बऱ्याच खेळांचा समावेश होत गेला आहे. त्याप्रमाणे २९ ऑक्टोबर १९०८ रोजी लंडन येथे भरलेल्या चौथ्या ऑलिंपिक खेळांत स्कॉटलंड व जर्मनी या दोन देशांत पहिला ऑलिंपिक सामना झाला. त्या सामन्यात स्कॉटलंडचा राष्ट्रीय संघ होता. पण जर्मन संघात पश्चिम जर्मनीतील हॅंबुर्ग येथील 'उहलेन होस्टरक्लब' च्या खेळाडूंचाच समावेश होता. या क्लबचा संघ आजही उत्कृष्ट मानला जातो. स्कॉटलंडने हा सामना ४ विरुद्ध ० गोलने जिंकला. त्यांच्या डाव्या आतील खेळाडू 'इ आव तेंग' याने ऑलिंपिक सामन्यात पहिला गोल करण्याचा मान मिळविला. त्यानंतर इंग्लंडने फ्रान्सचा १० विरुद्ध १ गोलने पराभव केला. उपान्त्य सामन्यांत चार ब्रिटिश संघच उरले. इंग्लंडने स्कॉटलंडचा ६ विरुद्ध १ गोलने व आयर्लंडने वेल्सचा ३ विरुद्ध १ गोलने पराभव केला. अंतिम फेरीत इंग्लंडची वेल्सशी गाठ पडली.

अंतिम सामना भव्य अशा 'व्हाईट सिटी स्टेडिअम' वर झाला. त्यात इंग्लंडने आयर्लंडचा ८ विरुद्ध १ गोलने पराभव करून ऑलिंपिक हॉकीतील पहिले अजिंक्यपद प्राप्त केले. हा ऐतिहासिक सामना पाहण्यास स्टेडियमवर त्या वेळी फक्त ५००० प्रेक्षक उपस्थित होते.

त्यानंतर पुढील दोन्ही ऑलिंपिक स्पर्धांतून हॉकी खेळाला वगळण्यात आले होते. पण नंतर १९२० साली अँटवर्प येथील ऑलिंपिक सामन्यांत हॉकीचा समावेश केला गेला. या वेळी इंग्लंड, फ्रान्स, बेल्जियम व डेन्मार्क या फक्त चारच संघांनी या स्पर्धेत भाग घेतला होता. ऑलिंपिकच्या इतर स्पर्धांपासून हॉकीला अगदी वेगळे ठेवण्यात आले होते. तसेच हे सामने प्रथमच साखळी पद्धतीने खेळले गेले. प्रत्येक संघ इतर संघाबरोबर खेळला.

इंग्लंडने बेल्जियमचा १२ विरुद्ध १ गोलने, डेन्मार्कचा ६ विरुद्ध १ गोलने पराभव केला, त्यानंतर इंग्लंड आणि फ्रान्स यांमधील अंतिम सामना झालाच नाही.

अंतिम सामन्याच्या आदले दिवशी हे दोन्ही संघ मॉन्टेव्हालर गावात फिरावयास गेले होते. त्यामुळे फ्रान्सचे खेळाडू आजारी पडले आणि मैदानावर येऊ न शकल्याने फ्रान्सच्या संघाला स्पर्धेतून बाद करण्यात आले. त्यामुळे इंग्लंडला ऑलिंपिकमध्ये १ ला आणि बेल्जियमला ३ रा क्रमांक मिळाला.

पुढे १९२४ सालच्या पॅरिस येथील ऑलिंपिक स्पर्धेसाठी पुरेसे हॉकी संघ न आल्यामुळे हॉकी स्पर्धाच झाल्या नाहीत. त्यामुळे हॉकी खेळात रस घेणाऱ्या राष्ट्रांत चळवळ चालली आणि त्यातूनच ७ जानेवारी १९२४ रोजी ( FIH ) "फेडरेशन ऑफ इंटरनॅशनल हॉकी" ही संस्था अस्तित्वात आली, आणि तेथूनच हॉकी खेळाची वाढ, नियम वगैरेकडे व्यवस्थित लक्ष पुरविण्यात येऊ लागले.

त्यानंतर ॲमस्टरडॅम येथे भरलेल्या नवव्या ऑलिंपिक स्पर्धांपासून हॉकी सामन्यांचे पुनरुज्जीवन करण्याचा निर्णय आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक हॉकी समितीने घेतला आणि त्याच वर्षांपासून जागतिक मानासाठी आपला हक्क सिद्ध करण्याची सुवर्णसंधी भारताने गमावली नाही. या वेळच्या स्पर्धेतील हॉकी सामने मे महिन्यात झाले व इतर मुख्य स्पर्धा जुलै महिन्यात झाल्या. या स्पर्धेत भाग घेण्यासाठी भारतीय संघ १० मार्चला मुंबई बंदरातून जहाजाने लंडनला निघाला. पहिल्याच पदार्पणात भारताने हॉकीत अजिंक्यपद मिळविले.

अशा रीतीने भारतीय हॉकीच्या भव्य व थरारक पर्वाचा प्रारंभ झाला. यापुढील सर्व ऑलिंपिक्समध्ये भारताने भाग घ्यावयास सुरुवात केली व ती आजपर्यंत. यानंतर हॉकी खेळाचा प्रसार जगभर होत गेला आणि हळूहळू ऑलिंपिक हॉकीमध्ये जास्त संघ भाग घेऊ लागले. १९३२ साली लॉस एंजिल्सला आणि १९३६ ला बर्लिनला ऑलिंपिक सामने झाले. यातही भारतीय संघाने हॉकीत अजिंक्यपद मिळविले. १९४० व १९४४ या साली दुसऱ्या जागतिक महायुद्धामुळे ऑलिंपिक सामने होऊ शकले नाहीत.

१९४८साली लंडनमध्ये पुन्हा ऑलिंपिक सामन्यांना सुरुवात झाली. १९५२साली हेलसिंकी, १९५६ साली मेलबोर्न, १९६० मध्ये रोम, १९६४ ला टोकियो, १९६८ सालात मेक्सिको, १९७२ मध्ये म्युनिच, १९७६ ला मॉन्ट्रियल आणि १९८० साली रशियात मॉस्को येथे ऑलिंपिक सामने झाले.

१९२८ च्या ॲमस्टरडॅम ऑलिंपिकमध्ये भारताने अंतिम सामन्यात हॉलंडवर ३ विरुद्ध ० गोलनी विजय मिळवून प्रथम अजिंक्यपद मिळविले आणि ते पुढील लॉस-एंजिल्स, बर्लिन, लंडन, हेलसिंकी, मेलबोर्न या सर्व ठिकाणी ऑलिंपिक हॉकी सामन्यांत टिकविले होते. पण पुढे १९६० साली रोम येथल्या ऑलिंपिकमध्ये हे अजिंक्यपद पाकिस्तानने मिळविले व भारत प्रथम पराभूत झाला. पुढील१९६४च्या टोकियो येथील ऑलिंपिकमध्ये भारताने हे अजिंक्यपद पाकिस्तानकडून हिरावून घेतले.

परंतु हे यश फारच थोडा काळ राहिले. कारण १९६८ च्या मेक्सिको ऑलिंपिक-मध्ये पाकिस्तानने परत अंतिम यश मिळविले आणि भारताचा तिसरा नंबर लागला.

त्यापुढील १९७२ च्या म्युनिच ऑलिंपिकमध्ये पश्चिम जर्मनी अजिंक्य ठरला आणि त्याने प्रथम सुवर्णपदक पटकाविले आणि भारत ब्राँझ पदकाचा मानकरी ठरला. त्यानंतर १९७६ च्या मॉन्ट्रिअल ऑलिंपिकमध्ये भारताने हॉकी जगतात आपले हसे करून घेतले व त्याला पाचव्या स्थानावर समाधान मानावे लागले. या १९७६ च्या दारुण पराभवानंतर पुढील ऑलिंपिकमध्ये भारताने भाग घ्यावा की नाही असा एक सूर निघाला होता, पण त्याला जास्त दुजोरा मिळाला नाही. १९७९–८० सालात जागतिक राजकारणात बरीच उलथापालथ झाली होती, त्यामुळे १९८० च्या मॉस्को येथील ऑलिंपिकवर बऱ्याच राष्ट्रांनी बहिष्कार टाकला आणि म्हणून ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत फक्त सहाच देशांनी भाग घेतला. भारताने या ऑलिंपिकमध्ये बऱ्याच अटीतटीच्या स्पर्धेनंतर १६ वर्षांनी पुन्हा अजिंक्यपद मिळविले. असा हा आतापर्यंत झालेल्या ऑलिंपिक सामन्यातील यशापयशाचा आढावा.

भारताने ऑलिंपिकमध्ये १९२८ पासून भाग घेण्यास सुरुवात केली. तेव्हा पहिल्या संघापासून अगदी १९८० च्या मॉस्को ऑलिंपिकपर्यंत भारताच्या हॉकी संघात कोणते खेळाडू निवडले होते ही माहिती जिज्ञासूंना मनोरंजक होईल म्हणून पुढे देत आहे.

**१९२८ ॲमस्टरडॅम** – जयपालसिंह ( कप्तान ), एस. एम. युसूफ, पतौडीचे नवाब ( सीनिअर ), ई. पेन्निगर ( उ. कप्तान ), आर. जे ॲलन, एम. रॉक, एन.सी. हॅमंड, आर. ए. नॉरिस, डब्ल्यू. कुल्लन, खेर सिंग, एम. गेटले, शौकत अली, जी. मार्थिन्स, ध्यानचंद, फिरोजखान, एफ. सीमन.

**१९३२ लॉस एन्जेलस** – लालशहा बुखारी ( कप्तान ), आर. जे. ॲलन, सी. टॅपसेल, ए. सी. हिन्द, एन. सी. हॅमंड, एस. असलाम, एफ. ब्रेविन, मसूद मिनहाज, ई. पेन्निगर, आर. जे. कार, गुरमितसिंग, ध्यानचंद, रूपसिंह, एम. जफ्फर, डब्ल्यू. पी. सुल्विन.

**१९३६ बर्लिन** – ध्यानचंद ( कप्तान ), एम. जाफर ( उ. कप्तान ), आर. जे. ॲलन, दाराशहा, सी. टॅपसेल, महमद हुसेन, डब्ल्यू. कुल्लन, जे. फिलिप्स, एम. एन. मसूद, अहसन मुहम्मदखान, पीटर फर्नांडिस, गुरुचरणसिंग, रूपसिंह, अहमद शेरखान, शहाबुद्दीन, बी. एम. निमल, एम्मेट, मिची, जे. गॅलीवर्डी.

१९४० व १९४४ दुसऱ्या महायुद्धामुळे स्पर्धा झाल्या नाहीत.

**१९४८ लंडन** – किशनलाल ( कप्तान ), के. डी. सिंग ऊर्फ ' बाबू ' ( उ. कप्तान ), लिओ पिन्टो, आर. फ्रान्सिस, त्रिलोचनसिंग, अख्तर हुसेन, डब्ल्यू. डिसूजा, आर. एस. जंटल, केशवदत्त, मॅक्सीवॉज, जसवन्तसिंग, एल. क्लॉडिअस, अमीरकुमार, एल. फर्नांडिस, लतीफ–उर–रहमान, पॅट जॉनसन, आर. रॉड्रीग्ज, जी. ग्लॅकेन, बलबीरसिंग, गृहनन्दनसिंग.

**१९५२ हेलसिंकी** – के. डी. सिंग ऊर्फ ' बाबू ' ( कप्तान ), आर. फ्रान्सिस ;

सी. देशमुख, आर. एस. जंटल, धरमसिंग, स्वरूपसिंग, एल. क्लॉडिअस, केशवदत्त, जी. पेरूमल, जयवन्तसिंग, रघुवीरलाल, सी. एस. दुबे, बलबीरसिंग, गुरुनन्दनसिंग, उधमसिंग, एम. राजगोपाल, एम. बलूच, सी. एस. गुरंग.

**१९५६ मेलबोर्न** – बलबीरसिंग ( कप्तान ), शंकर लक्ष्मण, आर. एस.जंटल, बाळकृष्ण सिंह, बक्षिससिंग, चार्ल्स स्टीफन, एल. क्लॉडिअस, जी. पेरूमल, ओ. पी. मल्होत्रा, ए. एस. बक्शी, गुरुदेवसिंग, बलबीरसिंग ( ज्युनिअर ), उधमसिंग, आर. एस. भोला, फ्रान्सिस, हरिपाल कौशिक.

**१९६० रोम** – एल. क्लॉडिअस ( कप्तान ), शंकर लक्ष्मण, सी. देशमुख, शांताराम, पृथ्वीपालसिंग, जे. एल. शर्मा, चरणजीतसिंग, पॅटिक, मोहिंदरलाल, जोगिंदरसिंग, व्ही. जे. पीटर, जसवंतसिंग, उधमसिंग, आर. एस भोला, हरिपाल कौशिक, बाळकृष्णसिंह.

**१९६४ टोकिओ** – चरणजीतसिंग ( कप्तान ), हरिपाल कौशिक, शंकर लक्ष्मण, आर. एस. ख्रिस्ती, गुरुबक्षसिंग, धरमसिंग, पृथ्वीपालसिंग, मोहिंदरलाल, राजेंद्रसिंग, जगजीतसिंग, जोगिंदरसिंग, हरबिंदरसिंग, उधमसिंग, व्ही. जे. पीटर, दर्शनसिंग, बलबीरसिंग ( ज्यूनिअर ), बन्डू पाटील, अली सईद.

**१९६८ मेक्सिको सिटी** – पृथ्वीपालसिंग ( कप्तान ), गुरुबक्षसिंग, ख्रिस्ती, मुनीरसेठ, धरमसिंग, बलबीरसिंग (सेना), अजीतपालसिंग, हरमिकसिंग, जगजीतसिंग, बलबीरसिंग ( रेल्वे ), व्ही. जे. पीटर, हरविंदरसिंग, कृष्णमूर्ति, इन्दरसिंह, इनाम-उर-रहमान, तरसेमसिंग.

**१९७२ म्युनिच**–हरमिकसिंग ( कप्तान ), मॅन्युअल फ्रेड्रिक्स, चार्लस, मुलबैन-सिंग, मायकल किंडो, अस्लम शेरखान, कृष्णमूर्ति, वीरेंद्रसिंग, अजित पालसिंग, वसपेअस, एम. जी. गणेश, व्ही. जे. फिलिप्स, हरबिंदरसिंग, कुलवंतसिंग, अजीतसिंग, अशोक-कुमार, गोविंदा, हरचरणसिंग.

**१९७६ मॉन्ट्रियल** – अजितपालसिंग ( कप्तान ), मोहिंदरसिंग, वीरेंद्रसिंग, हरचरणसिंग, चांदसिंग, अशोककुमार, व्ही. जे. फिलिप्स, प्रभाकरन, अशोक दिवान, वीरबहादूर छत्री, मायकेल किंडो, मेहबूबखान, भास्करन्.

**१९८० मॉस्को**–भास्करन् ( कप्तान ), बी. छत्री, ॲलन शोफिल्ड, गुरुमैलसिंग, रविंदरपाल, एन. एम. सोमय्या, राजिंदरसिंग, दविंदरसिंग, डुंगडुंग, चरणजितकुमार, मेलविन फर्नांडिस, सुरेंदरसिंग सोधी, महमंद शहीद, झाफर इक्बाल, अमरजीतसिंग, एम. कौशिक.

● ● ●

## प्रकरण ११

# आंतरराष्ट्रीय, विश्वचषक व आशियाई सामने

ऑलिंपिक सामने व त्यांचा आढावा आपण गेल्या प्रकरणात वाचला. ऑलिंपिक-व्यतिरिक्त पण तितकेच महत्त्वाचे आणखीही काही सामने होत असतात, त्याकडे आपण वळू.

### आंतरराष्ट्रीय सामने

हॉकीचे आंतरराष्ट्रीय सामने युरोपात विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून होऊ लागले होते. परंतु युरोपाबाहेरील देशांपर्यंत त्यांची मजल गेली नव्हती. पण आली भारतें त्यातही प्रगती होत गेली आणि साधारण १९५०-५१ च्या सुमारास इतर राष्ट्रांत होणाऱ्या दौऱ्यांव्यतिरिक्त प्रत्यक्ष आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या सामन्यांत भारत भाग घेऊ लागला होता.

त्याप्रमाणे १९५५ मध्ये 'वार्सा' येथील स्पर्धेत ७ राष्ट्रांनी भाग घेतला होता. त्यात भारताने सर्व सामने जिंकून वरचे स्थान प्राप्त केले होते. १९५९ साली बार्सिलोना ( स्पेन ) येथे झालेल्या आंतरराष्ट्रीय महोत्सवी सामन्यांत नेत्रदीपक कामगिरी करून भारताने पहिले स्थान पटकाविले होते. त्यानंतर म्युनिच ( जर्मनी ) येथील आंतरराष्ट्रीय महोत्सवी सामन्यांत भारताने ५ पैकी २ सामने जिंकले व ३ बरोबरीने म्हणजे अनिर्णित राहिले. येथे पाकिस्तान या स्पर्धेत उतरला नव्हता.

१९६२ साली भारतात सर्व प्रथम हे सामने अहमदाबाद येथे भरविण्यात आले होते. यात भारतासह १० देशांनी भाग घेतला होता. येथले सर्व सामने साखळी पद्धतीने खेळले गेले. याही स्पर्धेत भारताने आपले स्थान अबाधित राखले.

१९६३ मध्ये, फ्रान्समधील लिआन्स येथे खेळल्या गेलेल्या स्पर्धेत देखील पाकसहित एकूण १६ देशांनी भाग घेतला होता. येथेही भारताने यश आपल्याकडेच ठेवले होते.

पुढे १९६६च्या मे महिन्यात पश्चिम जर्मनीच्या हॅम्बर्ग येथे आंतरराष्ट्रीय स्पर्धा झाल्या. त्यात १० राष्ट्रांनी भाग घेतला होता. यातही भारत प्रथम क्रमांकावर राहिला होता.

१९६७ साली माद्रिद ( स्पेन ) येथे या स्पर्धा घेतल्या गेल्या. या स्पर्धेत ९ राष्ट्रांचा सहभाग होता आणि विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे येथेही भारताने

प्रथम क्रमांक पटकाविला.

त्यानंतर १९७० साली भारतात, मुंबई येथे या स्पर्धा भरल्या होत्या. या स्पर्धेत मात्र पश्चिम जर्मनीच्या संघाने प्रथम क्रमांक मिळविला.

## आशियाई सामने

१९५८ साली टोकियो येथे पहिली आशियाई हॉकी स्पर्धा झाली. भारत व पाकिस्तान यांसह या स्पर्धेत ५ देशांनी भाग घेतला होता. सर्व सामने साखळी पद्धतीने खेळले गेले. त्यात गोल संख्यांच्या आधारावर पाकिस्तानी संघाला पहिला क्रमांक मिळाला आणि दुसरा भारताचा होता.

१९६२ साली इंडोनेशियाची राजधानी 'जाकार्ता' येथे या स्पर्धा झाल्या. टोकियो धर्तीवरच येथले सामने खेळले गेले. ह्या वेळी संघांचे दोन गट पाडण्यात आले होते. येथ पाकिस्तानने परत अंतिम विजय मिळविला.

त्यानंतर चार वर्षांनी म्हणजे १९६६ साली थायलंडची राजधानी बँकॉक या सुंदर शहरात या स्पर्धा झाल्या. या वेळी एकूण ९ राष्ट्रांनी भाग घेतला होता. येथेही संघाचे दोन गट पाडण्यात आले होते व सामने साखळी पद्धतीने झाले. येथे अंतिम विजय भारतानेच मिळविला.

पुढे १९७० साली पुन्हा बँकॉक येथेच या स्पर्धा झाल्या. यात पुन्हा पाकिस्तानला प्रथम क्रमांक मिळाला. १९७४ साली हे सामने तेहरान येथे होऊन भारताने अजिंक्यपद प्राप्त केले. पण १९७८ साली बँकॉक येथेच झालेल्या स्पर्धांत भारताला पाकिस्तानने हरवून अंतिम विजय प्राप्त केला.

## विश्वचषक हॉकीस्पर्धा ( World Cup Hockey Tournaments )

स्पेनमध्ये बार्सिलोना येथे १९७१ साली प्रथम विश्वचषक हॉकी स्पर्धांना सुरुवात झाली. या स्पर्धांनाही ऑलिंपिक हॉकी स्पर्धेइतकेच महत्त्व आले आहे. ऑलिंपिक हॉकी स्पर्धाप्रमाणेच यात भाग घेणाऱ्या संघाचे दोन गट ( Pool ) केले जाऊन त्यांच्यातले सामने लीग पद्धतीवर खेळले जातात. गुणानुक्रमाप्रमाणे प्रत्येक गटातील आलेल्या पहिल्या दोन संघांत नंतर बाद पद्धतीने सामने होऊन शेवटी विजेते व उपविजेतेपद दिले जाते.

जगातील सर्व खंडांतील हॉकी खेळणाऱ्या देशांतील संघाला यात भाग घेता येतो. परंतु ज्या देशात त्या वर्षी स्पर्धा होतात तो यजमान संघ, गेल्या खेपेचा विजेता व उपविजेता संघ, त्या वर्षीचा ऑलिंपिक हॉकी स्पर्धांतील विजेता व उपविजेता संघ आणि त्यानंतर ऑलिंपिक स्पर्धेत गुणानुक्रमावरील संघ अशा संघांचा या विश्वचषक स्पर्धेत समावेश केला जातो.

१९७१ च्या बार्सिलोना येथील प्रथम स्पर्धेत अंतिम सामन्यात पाकिस्तानने स्पेनवर २ विरुद्ध १ गोलने विजय मिळविला. १९७३ साली झालेल्या ॲमस्टरडॅम

येथील स्पर्धेत हॉलंडने भारताला अंतिम सामन्यात १ विरुद्ध ० गोलने पराभूत करून विश्वचषक जिंकला होता. पुढे १९७५ साली कौलालंपूर येथे झालेल्या तिसऱ्या स्पर्धेत भारताने पाकिस्तानला १ विरुद्ध ० गोलने पराभूत करून विश्वचषक जिंकला. त्यानंतर १९७८ ला ब्यू ओनिस आयर्स येथे झालेल्या चौथ्या स्पर्धेत पाकिस्तानने हा चषक प्राप्त केला आहे.

पाचव्या विश्वचषकाच्या स्पर्धा १९८२ साली भारतात व खुद्द मुंबईत होणार आहेत. ब्यू ओनिस आयर्स येथील सामने नैसर्गिक हिरवळीवरच खेळले होते आणि १९८२ साली भारतातही तसेच नैसर्गिक हिरवळीवरच हे सामने होतील. सामन्यांसाठी तयारी जोराने चालू असून त्यात यजमानपद भारताकडे आहे तेव्हा चषक मिळविण्याचा मान आपणाकडे राहावा या दृष्टीने खेळांची तयारी करून केली जात आहे. या स्पर्धेत एकूण १२ संघांचा समावेश करण्यात आला आहे.

## राष्ट्रीय चॅंपिअनशिप टूर्नामेंट्स

१९२८ सालापासून राष्ट्रीय चॅंपिअनशिप टूर्नामेंटस सुरू झाल्या. ( याच वर्षी भारताने प्रथम ऑलिंपिक हॉकी स्पर्धेत पदार्पण करून अजिंक्यपद प्राप्त केले होते ) त्यापुढे १९४४ पर्यंत दर दोन वर्षांनी या टूर्नामेंट्स घेतल्या जात आहेत. प्रथमपासून या टूर्नामेंट्सच्या विजेत्या संघासाठी म्हणून अधिकृत अशी ढाल अगर चषक नव्हता. पण १९३५ साली भारतीय संघ न्यूझीलंडच्या दौऱ्यावर असताना तेथील लोकांना भारतीय हॉकीचा खेळ म्हणजे एक जादूचाच खेळ वाटे. त्यामुळे तेथील एक रहिवाशी श्री. मूर यांनी भारतीय संघाच्या गौरवासाठी एक ढाल दिली आणि पुढे हीच ढाल राष्ट्रीय चॅंपिअनशिपची फिरती ढाल म्हणून वापरण्यात येऊ लागली. पुढे १९४६-४७ साली ही ढाल पंजाब टीमने जिंकली. भारताचे तेव्हा विभाजन झाले नव्हते म्हणून पंजाबची तेव्हाची राजधानी लाहोर येथे ही ढाल गेली. १९४७ ला भारताचे विभाजन होऊन पाकिस्तान निर्माण झाले. तेव्हा ती ढाल पाकिस्तानमध्येच राहिली.

पुन्हा चॅंपिअनशिपसाठी ढाल किंवा चषकाचा प्रश्न उभा राहिला. मद्रास येथील 'हिंदु' व 'स्पोर्ट आणि पास्टटाईम' या नियतकालिकांतर्फे 'रंगस्वामी कप' नावाचा चषक १९५१ मध्ये या स्पर्धासाठी देणगी म्हणून मिळाला आणि आजतागायत तोच फिरता चषक या टूर्नामेंट्समध्ये आहे.

हे जे आतापर्यंत राष्ट्रीय चॅंपिअनशिपचे सामने झाले ते कोठे, किती वेळा झाले आणि त्यात कोणत्या संघांनी किती वेळा अंतिम यश मिळविले ही माहितीदेखील मनोरंजक आहे.

मुंबई ८, कलकत्ता ७, मद्रास ४, हैदराबाद, भोपाळ व जलंदर येथे प्रत्येकी ३ वेळा, बंगलोर, दिल्ली, पुणे, मदुराई येथे प्रत्येकी २ वेळा, वेलिंग्टन, कटक, एर्नाकुलम व गोरखपूर या ठिकाणी प्रत्येकी एक वेळा हे सामने खेळले गेले.

या खेळल्या गेलेल्या सामन्यांत रेल्वेसंघाने सर्वाधिक म्हणजे १४ वेळा अंतिम विजय प्राप्त केला. त्या खालोखाल पंजाबने १२ वेळा, सैन्य दलाने ५ वेळा, बंगालने ३ वेळा, मुंबई, भोपाळ, मद्रास व हवाईदलाच्या संघाने प्रत्येकी २ वेळा आणि उत्तर प्रदेश व दिल्ली संघांनी प्रत्येकी एक वेळा अंतिम विजय मिळविला आहे.

आतापर्यंत हे जे सामने झाले त्यांत मद्रास येथे १९७७ साली झालेल्या स्पर्धांसाठी सर्वांत अधिक म्हणजे २८ संघांनी भाग घेतला होता.

वरील सामने कधी कोणत्या ठिकाणी झाले व अंतिम विजयाचे मानकरी कोण ठरले होते याबद्दल सविस्तर माहिती परिशिष्ट १ मध्ये दिली आहे.

## इतर महत्त्वाच्या स्पर्धा अगर टूर्नामेंट्स

### ( १ ) बेटन कप टूर्नामेंटस

देशातील सर्वांत जुनी टूर्नामेंट्स म्हणजे 'बेटनकप' हॉकी टूर्नामेंट्स. या टूर्नामेंट्सची सुरुवात १८९५ पासून कलकत्ता येथे सुरू झाली.

### ( २ ) आगाखान हॉकी टूर्नामेंट्स

या टूर्नामेंट्स १८९६ सालापासून मुंबई येथे खेळण्यास सुरुवात झाली. यासाठी स्वर्गीय आगाखानांनी एक फिरती ढाल देणगी म्हणून दिली होती आणि म्हणून त्यांच्या नावाने या टूर्नामेंट्स दरवर्षी मुंबईत भरत असतात. ही ट्रॉफी १९१२ मध्ये पेशावर रेजिमेंटने जिंकली होती. पण ही ट्रॉफी त्यांच्याकडून परत आली नाही म्हणून दुसरी ट्रॉफी स्वर्गीय आगाखानांनीच बहाल केली आहे.

( ३ ) १९३६ सालापासून भोपाळ येथे 'ओबेदुल्लाखा' गोल्ड कप टूर्नामेंटस खेळल्या जात आहेत.

( ४ ) १९४५ पासून डी. सी. एम. हॉकी टूर्नामेंट्स दिल्ली येथे होऊ लागल्या. त्या १९५७ पर्यंत दिल्लीतच होत असत. त्यानंतर आता या स्पर्धा कोटा येथे होतात.

( ५ ) १९५५ पासून मुंबईला गोल्ड कप टूर्नामेंट्स चालू झाल्या. अशाच तऱ्हेच्या स्पर्धा मद्रास येथेही खेळल्या जातात.

( ६ ) दिल्ली येथे १९६४ सालापासून नेहरू हॉकी टूर्नामेंट्स घेण्यात येत आहेत.

### ( ७ ) रॅनी फ्रँक टूर्नामेंट्स

आंतर-राष्ट्रीय हॉकी फेडरेशनचे अध्यक्ष रॅनी फ्रँक भारतात आले होते. तेव्हा त्याची आठवण म्हणून भारतीय हॉकी फेडरेशने १९६९ सालापासून ही टूर्नामेंट सुरू केली. अखिल भारतीय राष्ट्रीय टूर्नामेंट्समध्ये अंतिम सामन्यापर्यंत पोचलेल्या संघांनाच यात भाग घेता येतो. या टूर्नामेंट्स मुंबई येथेच होतात.

( ८ ) पाकिस्तान व भारत यांच्यातले मैत्रीचे संबंध जास्त दृढ होण्याच्या दृष्टीने या दोन्ही देशांत आलटूनपालटून कसोटी सामने १९७८ पासून खेळण्यास सुरुवात झाली आहे.

याशिवाय आंतरराष्ट्रीय चँपिअन ट्रॉफी टूर्नामेंट्स नावाच्या स्पर्धाही १९७६-७७ सालापासून सुरू आहेत. शिवाय चौरंगी सामन्यांना नुकतीच सुरुवात झाली आहे.

वरील सर्व स्पर्धा व टूर्नामेंट्सव्यतिरिक्त निरनिराळ्या प्रांतांत अनेक तऱ्हेच्या हॉकी स्पर्धा देखील होत आहेत.

महिला देखील हल्ली हॉकीमध्ये बऱ्याच आघाडीवर आहेत व त्यांचे परदेशी दौरे व कसोटी सामने देखील होऊ लागले आहेत. १९८० च्या मॉस्को ऑलिंपिकमध्ये प्रथमच महिला हॉकीचा समावेश करण्यात आला असून भारतीय महिला संघाने यात फारच उत्कृष्ट खेळ केला होता.

● ● ●